

# धर्मकीर्तन

वामनराव चोरघडे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# धर्मकीर्तन

किंबहुना तुमचे केले। धर्मकीर्तन हे सिद्धी गेले।
येथ माझे जी उरले। पाईकपण ।।

ज्ञाने. १८/१७९२

लेखक : वामनराव चोरघडे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : ऑक्टोबर १९८६

प्रकाशक : श्री. सु. द्वा. देशमुख
सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२



मुद्रक : व्यवस्थापक
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय
चर्नी रोड, मुंबई ४०० ००४



किंमत : रु. १०.००

## समर्पण

धर्मस्थापनचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढे होणार । देणे ईश्वराचें ।। २० ।।

उत्तम गुणाचा ग्राहिक । तर्क तीक्षण विवेक ।
धर्मवासना पुण्यश्लोक । देणे ईश्वराचें ।। २१ ।।

सकळ गुणांमध्यें सार । तजविजा विवेक विचार ।
जेणे पाविजे पैलपार । अरत्रपरत्रीचा ।। २२ ।।

दासबोध
दशक अठरावा–समास सहावा

# निवेदन

भारताच्या स्वातंत्र्य संग्रामात देशातील इतर ठिकाणांप्रमाणेच वर्धा जिल्ह्यानेही प्रशंसनीय कामगिरी बजावलेली आहे. परंतु त्याला व विशेषत: वर्धा शहर आणि सेवाग्राम यांना स्वातंत्र्येतिहासात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले ते महात्मा गांधी व आचार्य विनोबा भावे यांच्या तेथील वास्तव्यामुळे.

गांधी--विनोबांना वर्ध्याला आकर्षून घेण्यात सुप्रसिद्ध गांधीवादी उद्योगपती श्री. जमनालाल बजाज यांचा फार मोठा वाटा आहे. विनोबाजी १९२१ साली वर्ध्याला आले व गांधीजी १९३३ साली. पुढे १९३६ साली गांधीजी सेवाग्रामला गेले. १९३३ पासून तो गांधीजींच्या मृत्यूपर्यंत वर्धा–सेवाग्राम हीच त्यांच्या कार्याची मुख्य केंद्रे होती.

त्या काळात वर्धा–सेवाग्राम ही भारताची राजकीय राजधानीच झाली होती असे म्हटले तर ते त्यांच्या स्थान-महात्म्याचे यथार्थ वर्णन होईल. काँग्रेस वर्किंग कमिटीच्या अनेक बैठका तेथे झाल्या. अखिल भारतीय काँग्रेस अधिवेशनही तेथे भरवले गेले होते. भारताच्या भावी इतिहासाला नवीन वळणे देणारे ठराव वर्किंग कमिटीने वर्ध्याला सम्मत केलेले आहेत. 'छोडो भारत' आंदोलनाचे बीजही येथेच पेरले गेले. रचनात्मक कार्याच्या आणि सर्वोदयाच्या अनेकविध प्रयोगांनी वर्ध्याचा संपूर्ण परिसर बहरून गेला. सारे वातावरण व लोकजीवन गांधीमय झाले. अनेक जणांना देशासाठी त्याग करण्याची प्रेरणा त्यापासून मिळाली. कार्यकर्त्यांचे मोहोळ निर्माण झाले. अखिल भारतीय स्तरावर कार्य करणाऱ्या कित्येक संस्थांची स्थापना वर्धा-सेवाग्रामला झाली. सेवाग्रामचा गांधीजींचा आश्रम, तिथलाच नई तालिमी संघ, वर्ध्यातील राष्ट्रभाषा प्रचार समिती व मगनवाडी, दत्तपूर येथील कुष्ठधाम, नालवाडीचे चर्मालय यांसारख्या संस्था म्हणजे गांधी–विनोबांच्या सामाजिक-आर्थिक पुनरुत्थानाच्या प्रयोगांची जिवंत स्मारकेच आहेत. या कार्याची जबाबदारी उचलण्यासाठी आचार्य काका कालेलकर, आचार्य दादा धर्माधिकारी, श्रीकृष्णदास जाजू, मनोहरजी दिवाण, किशोरलाल मश्रूवाला, जे. सी. कुमारप्पा, श्रीमन् नारायण, आर्यनायकम्, आशादेवी आर्यनायकम्, यांच्यासारख्या तोलामोलाच्या व्यक्तींनी स्वतःला वाहून घेतले.

या सर्व उपक्रमांमागे जमनालाल बजाज पहाडासारखे उभे राहिले. त्यांनी गांधी--विनोबांना तर वर्ध्याला आणलेच आणि त्यांची व इतर नेत्यांची सर्वतोपरी काळजी वाहिली, परंतु असंख्य कार्यकर्त्यांनाही, त्यांचे गुण हेरून, योग्य त्या संस्था-कार्यास वाहून घेण्यासाठी प्रवृत्त केले.

अशा या वर्धा–सेवाग्रामचे ऐतिहासिक महत्त्व शब्दांकित करण्याची नितांत आवश्यकता होती. गांधीजींच्या वास्तव्य कालातील तेथील पुनीत वातावरणाचे चित्रण करण्याची

गरज होती. आणि त्या संदर्भात, धनवान असूनही समर्पणाच्या वृत्तीने जीवन जगलेल्या जमनालाल बजाज यांच्या लोकविलक्षण आयुष्याचा आलेखही काढणे जरूर होते, कारण वर्धा-सेवाग्रामचे ते शिल्पकार होते.

हे कार्य प्रथितयश मराठी साहित्यिक व अर्थशास्त्राचे प्राध्यापक श्री. वामनराव चोरघडे यांनी हे पुस्तक लिहून सिद्धीस नेले आहे. त्याबद्दल त्यांना शतशः धन्यवाद. स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीच्या काळातील वातावरणाचे ते साक्षीदार होते. म्हणूनच त्यांनी गांधीजी, विनोबाजी व जमनालालजी विषयींच्या अत्यंतिक भक्तिभावाने व आदर भावनेने या पुस्तकाचे लेखन केले आहे. श्री. रामकृष्ण बजाज यांच्या सहकार्यामुळे हे पुस्तक साहित्य संस्कृती मंडळास प्रसिद्ध करण्यास मिळाले याबद्दल आम्ही श्री. बजाज यांचे आभारी आहोत. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या शताब्दीच्या निमित्ताने हे पुस्तक प्रसिद्ध करता येत आहे हे मंडळाचे भाग्य आहे.

सुरेंद्र बार्लिंगे

४२, यशोधन, दिनशा वाच्छा मार्ग,
मुंबई ४०० ०२०.

२ ऑक्टोबर १९८६, गांधी जयंती.

# मुक्तिपर्व

कीर्तन करायचेच तर आधी करावे रामाचे नंतर करावे कामाचे ! राम कामात मिसळला तर कामात 'राम' येऊन बसतो, ही वैदिक रीती आहे आणि साधनेचा पाया उभारला आहे तो यावरच !

बायबलमध्ये 'नव्या करारा' त काही सूक्ते आहेत. अठराव्या सूक्तातल्या दोन ओळी विसरू म्हटले तरी कठीण आहे. त्या 'व्हेअर देअर ईज नो व्हिजन, द पीपल पेरिश, बट ही दॅट किपेथ द लॉ हॅपी ईज ही ! ' संकल्प, भक्ती दोहींना प्रतिष्ठा मिळाली. जे राष्ट्र अथवा लोक स्वप्ने पाहू शकत नाहीत त्यांचा विनाश ठरलेलाच आहे. परंतु जो धर्माज्ञा पाळतो तोच सुखी होतो.

स्वप्ने किंवा दृष्टांत का पडतात ? कोणाला पडतात ? हा विषय बुद्धिवादाचा होऊ शकतो. पण भक्ती, निष्ठा दृढ असेल तर जागेपणी संकल्पसिद्धी होऊन जाते.

परतंत्र भारताला अशी स्वप्ने पडू लागली, तो काळ भाग्याचाच म्हणावा लागेल. आत्मग्लानीमुळे संकल्प-विकल्पाच्या फेऱ्यात सापडणे अपरिहार्यच होते. पहिले स्वप्न भारताला पडले ते १८५७ साली. एक समूहच्या समूह जागा झाला. अपयश आले पण ही जाग मात्र कायम राहिली. स्वप्ने पडतच राहिली आणि उण्यापुऱ्या तीस वर्षांच्या कालावधीत एकाचे अनेक दृष्टांत होऊन अखिल भारतीय काँग्रेसची स्थापना झाली.

काँग्रेसचा इतिहास येथे कर्तव्य नाही. त्यावेळचा मध्य प्रदेश व विदर्भ कसा जागला, त्याने काय केले, त्याची माहिती देखील येथे अभिप्रेत नाही. पण अखिल भारत, नंतर प्रांत, नंतर जिल्हे, नंतर खेडीपाडी या सगळ्या हकीकतीचा मोहक वृत्तांत ! हा मोह आवरूनच काही विशेष प्रयोजनाने—भारतीय धर्माचे, भारतीय संस्कृतीचे, भारतीय राज्य-स्वराज्याचे केंद्र बनलेल्या वर्धा शहरापुरतीच मर्यादा येथे सांभाळायची आहे. प्रांतांचा, देशाचा अनुषंग, संदर्भ सोडणे तर अशक्यच आहे. हा संदर्भ यथाशक्य जोडून-जुळवून वर्धेचा उत्थान महिमा सांगण्याचा हा प्रयास !

वर्धा शहराला शंभर वर्षांपूर्वी इतिहास तर नव्हताच पण भूगोलही नव्हता. १८६२ पर्यंत नागपूर जिल्ह्यातच या पालकवाडीचा समावेश होता. ब्रिटिशांच्या शासन विस्तारात वाढ झालेला आणखी एक जिल्हा तयार झाला आणि त्याचे शासनस्थान कवठा येथे ठेवण्यात आले. त्यानंतर १४–१५ वर्षांत इ. स. १८७६ मध्ये कवठचाहून जिल्हा कचेरी पालकवाडीला आली. आणि हीच पालकवाडी पुढे वर्धा म्हणून ओळखली जाऊ लागली. जुनी माणसे पहिल्या महायुद्धापर्यंत 'जरा पालकवाडीला जाऊन येतो', असेच म्हणायची. पण पुढे पुढे वर्धा म्हणण्याची सवय झाली. ब्रिटिश शासनाचा राबता वर्धेला होऊ लागला. दळणवळणाची साधने इतर जिल्ह्यांशी जोडली गेली.

वर्धा हेच नाव का पडले, याचा संदर्भ अंदाजानेच सांगता येतो. एखाद्या गावाचा महिमा वाढला—गावाचाच काय नावाचा महिमा वाढला की, त्याचा पूर्वेतिहास उजळ करण्याचा

प्रयत्न होतो. वर्धा नदीवरून हे नाव पडले असे म्हणावे, तर वर्धा नदी येथून ३२ किलो मीटर अंतरावरून वाहते. वर्धा नदी 'वरदा' म्हणून संबोधिली जाऊ शकते. नदी म्हणजे ईश्वराचे वरदान; वाहती कृपाच ! 'फेडीत पाप-ताप पोखीत तिरींचे पादप। समुद्रा जाय आप' हे वर्णन केवळ गंगेलाच नाही, तर भारतातील कोणत्याही लोकमातेला लागू पडते. वर्धा शहराबद्दल दुसरीही उपपत्ती प्रचारात आहे. या नदीच्या परिसरात वटवृक्ष पुष्कळ. भारताच्या सांस्कृतिक जीवनात वटवृक्षाची थोरवी त्याच्या पारंब्यांइतकीच प्राचीन आहे. "वड-पिंपळ दोघे भाऊ, त्यांच्या सावलीत सुखाने राहू" ही भारतीयांची अति प्राचीन वहिवाट ! वटवृक्षाच्या बहुलते-मुळे वरोडा, वाढोणा, वडनेरा याच चालीवर 'वटदा', 'वडदा', 'वर्धा' असेच काहीसे झाले असावे. कोणत्याही कारणामुळे एखादे नाव-गाव प्राचीन परंपरेशी जोडले गेले, तर भारतीय माणसाला आनंद होतो.

१८८५ पासून या छोटयाशा १५-१६ हजार वस्तीच्या गावाला स्वप्ने पडू लागली. दृष्टांत होऊ लागले. संकल्प सुचू लागले. 'संकल्पस्तुमानसंकर्म' याच्याही पुढे जाण्याची स्थिती निर्माण झाली. ब्रिटिश राजवटीची जिल्ह्याची ठिकाणे एका विशिष्ट पद्धतीने वसविली जात असत. कुठलेही जिल्ह्याचे प्रमुख ठिकाण घ्या, त्याचे दोन भाग असायचेच. एक विभाग मुलकी, सभ्य म्हणजे 'सिव्हिल' ठरलेलाच. जिल्हा म्हटला की, सिव्हिल लाईन आलीच. या सिव्हिल लाईनमध्ये सरकारच्या कचेऱ्या आणि त्याच्याही पल्याड गावाच्या दूर तीन बंगले. एक डिसी साहेबांचा, एक डिएसपी साहेबांचा आणि एक सिव्हिल सर्जनचा. या तिघाही गोऱ्या साहेबांनी सिव्हिल लाईनमध्ये राहून बाहेरच्या सगळ्या शेळ्या हाकायच्या ! खरे म्हणजे पटवारी आणि कोतवाल यांनाही तिथेच बोलवायचे. पण इंग्लंडवरून कोतवाल-पटवारी येऊ शकत नसत. अधिक जनसंपर्क वाढला तर अधिकाऱ्यांचा आब–रुबाब राहील कसा ? ब्रिटिशांची रीत-नीत भीतीवरच उभारली होती. आता ब्रिटिश गेले आणि लोकवस्ती वाढल्यामुळे सगळ्या सिव्हिल लाईन्स बुजून गेल्या. बरे झाले की वाईट, कोण जाणे !

२८ डिसेंबर १८८५ रोजी, मुंबईस गोकुलदास तेजपाल संस्कृत कॉलेजच्या इमारतीत काँग्रेसचे पहिले अधिवेशन थाटात पार पडले. ७२ मंडळी हजर होती. 'हिंदी लोक आपला कारभार चालविण्यास नालायक आहेत' हा कलंक दूर करण्याच्या हेतूने काँग्रेसने विचार-विनिमय केला. अव्वल इंग्रजी आमदानीत शासनाचा कारभार इंग्रजीतून चालविण्यास पुरेसे लोक नसत. म्हणून बाहेरची मंडळी बोलावण्यात आली आणि बोस, भिडे, पाठक, महाजन, पटवर्धन, दीक्षित, कोल्हटकर, गाडगीळ, नायडू इत्यादी घराणी नागपुरास आली. येताना आपल्याबरोबर कलकत्ता आणि मुंबईचे वातावरण घेऊन आल्यामुळे सार्वजनिक जीवनास सुरुवात झाली. स्थानिक घराणी किनखेडे, बुटी, चिटणवीस ही देखील सार्वजनिक कार्यात भाग घेऊ लागली. आणि नील सिटी स्कूल, मॉरिस कॉलेज, लोकसभा, गोरक्षण सभा, स्थापन झाल्या. १८९१ पर्यंत "इंडिपेंडंट", "देशसेवक" व "गोरक्षा" ही वृत्तपत्रे निघाली. कॉलेजातील प्रोफेसर मंडळी प्रगतिशील विचारसरणीला चालना देऊ लागली. कै. बळवंतराव महाजन, गुरुवर्य म. म. केशवरावजी ताम्हण ही शिक्षणक्षेत्रातील मंडळी लोक जागृतीस मदत करू लागली व या प्रांताचे सार्वजनिक जीवन जागले. पहिली राजकीय संस्था म्हणजे १८८६ साली स्थापन झालेली लोकसभा. गोरक्षण सभाही असेच कार्य करू लागली आणि मध्य प्रदेश, वऱ्हाड मिळून संस्थेच्या ४७ शाखांमधून लोकजागृतीला चालना मिळू लागली. अखिल

भारतीय काँग्रेसच्या अधिवेशनाला इकडील मंडळी जाऊ लागली. १८८९ च्या दरम्यान या प्रांतातून अखिल भारतीय काँग्रेसच्या मुंबई अधिवेशनाला २१४ प्रतिनिधी गेले होते. पण 'उत्तिष्ठत, जाग्रत' हा मंत्र रुजला तो १८९१ मध्ये, स्वराज्य मिळविण्याचा निश्चय करणारे लो. बाळ गंगाधर टिळक या प्रांतात आले तेव्हाच ! त्यांच्या आगमनाचे निमित्तच 'लोक-जागृती' हे होते. १८९१ मध्ये काँग्रेसचे अधिवेशन नागपूरला झाले. ते यशस्वी करण्याचे श्रेय बॅरि. नारायणस्वामी, प्रो. भगीरथ प्रसाद, प्रो. कृष्णराव देशपांडे, श्री. गोपाळराव भिडे, श्री. राजारामपंत दीक्षित, मुधोळकर, देवराव विनायक, श्री. केशवराव जोशी यांना द्यावे लागेल. या सर्वांच्या कृती-स्मृतीला प्रणाम !

येथून जे नवचैतन्य निर्माण झाले ते वाढतच गेले. त्याकाळी काम करणारी मंडळी निरलस, निरपेक्ष, स्वार्थत्यागी होती. काँग्रेससाठी पैसा गोळा करणे, हे त्यावेळी फार मोठे दिव्य होते. आपल्याच प्रांतातील हकीगत म्हणून एक गोष्ट नमूद करणे बरे ! येथील काँग्रेसचे एक चिटणीस केशवराव जोशी हे नील सिटीचे हेडमास्तर होते. त्यांनी स्वतः बैलगाडीतून हिंडून पैसा गोळा केला. दुसरे चिटणीस लाला भगीरथ प्रसाद यांनी अधिवेशनासाठी जमविलेल्या सामुग्रीतून अधिवेशन संपल्यावर उरलेले बटाटे भर बाजारात बसून विकले व आलेली रक्कम स्वागत कमिटीच्या दप्तरात दाखल केली. ही पोटतिडीक सार्वजनिक जीवनाच्या अनेकानेक उन्मेषांना कारणीभूत झाली. काहीतरी विशेष व्हावे व ते सर्वांगीण असावे, हे विचार नेट धरू लागले. श्रीकृष्णराव फाटकांच्या खटपटीने पुलगावची गिरणी, रावसाहेब केशवराव मवाळ-करांच्या प्रयत्नांनी हिंगणघाटची कापड गिरणी सुरू झाली. हातमाग उद्योगाचा विकास करण्याचे प्रयत्न सुरू झाले. सामाजिक चळवळीत नागपूर वऱ्हाडप्रांत रस घेऊ लागला. नंदनमिश्र समाज, सनातन धर्मसभा, शेतकऱ्यांची चळवळ अशा अनेकांगी कार्याची जागृती १८९९ पर्यंत होत राहिली. तळमळीच्या कार्यकर्त्यांनी जसे लोकांना जागे केले तसेच सरकारही जागे झाले आणि हार-जितीचा खेळ सुरू झाला. एकीकडे लो. टिळक आणि दुसरीकडे लॉर्ड कर्झन, असा सामना पुढे रंगतच गेला !

या स्वप्न-दृष्टांताच्या काळात आम्ही भारतीय दुःख-विपत्तीत होतो. जाळ-जंजाळात होतो, हे कबूल. ब्रिटिश साम्राज्यावर सूर्य मावळत नव्हता, हे देखील कबूल ! पण सूर्य केवळ ब्रिटि-शांनाच प्रकाश देत होता आणि आम्हाला देत नव्हता, हे मात्र एकदम नाकबूल ! 'धाता यथा पूर्वमकल्पयत्' च्या काळापासून आदित्य देवता सर्वांचीच होती. आणि तो वायु ! तो एकटा ब्रिटिशांसाठीच वाहात नव्हता आणि ते कृष्णाच्या-रामाच्या रंगाचे निळे-काळे ढग, त्यातून बरसणाऱ्या जलधारा ! त्या तर ब्रिटिशांपेक्षाही आमच्यावर अधिक कृपा करीत होत्या. हा वारा, या जलधारा, यांचा आसेतुहिमालय मुक्त संचार ! मद्रास, लाहोर, कलकत्ता, कराची चहूदिशांहून येणारा वारा, बरसणाऱ्या जलधारा काय काय आमच्यापर्यंत पोहोचवीत होत्या याची कल्पना सत्ताधाऱ्यांना नव्हती. दारे-खिडक्या उघडण्याचीच देर की, वारा-प्रकाश शिरलाच ! 'बया दार उघड, दार उघड बया' ! अंधार आणि अंधेर दोन्ही संपविण्याची स्वप्ने ज्यांच्या ज्यांच्या वाणीकरणीने आकारास येत होती त्यांना आजवर आम्ही प्रणामच करीत आलो.

लो. टिळकांनी सर्वत्र चैतन्य आणले, याबद्दल वाद नाही. पण त्यांनीही पूर्वसूरींकडून चैतन्य घेतले होतेच. तेजाला नवे-जुने काहीही नसते. ते असते घेणाऱ्याच्या कुवतीवर ! राष्ट्रीय

काँग्रेसचा संदेश नागपूरला असाच चहूबाजूंनी पसरला. वर्धा जिल्हा आणि वर्धा तहसील एवढीच मर्यादा घातली तरी आदर-प्रणामाचे प्रसंग लोभनीयच आहेत. तसा इतिहास अल्पसा का होईना उपलब्ध आहे. १९३५ साली नागपूर प्रांतिक काँग्रेस कमिटीने पन्नास वर्षे पूर्ण केली. त्यावेळी सुवर्ण ज्युबिली कमिटीने नागपूर प्रांताचा इतिहास प्रसिद्ध केला. त्यात गाव—तहसील-वार नोंदी आहेत. अनेकांनी अविश्रांत परिश्रम करून हा इतिहास शक्य तो परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला. इ. स. १९३२ मध्ये नागपूर प्रांतिक काँग्रेस कमिटीचे दप्तर जप्त झाले. या आपत्तीवर मात करूनही अध्यक्ष (कै.) गोपाळ अनंत ओगले, चिटणीस (कै.) माधव जनार्दन कानेटकर, प्रयागदत्त शुक्ल यांनी हा इतिहास प्रसिद्ध केला. नागपूर प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष डॉ. ना. भा. खरे यांनी या पुस्तकाचा पुरस्कार केला. हा ग्रंथ आता उपलब्ध नाही. अखिल भारतीय काँग्रेसचे ६४ वे अधिवेशन ९ जानेवारी १९५९ ला नागपूरला झाले. त्यावेळी उपरोक्त पुस्तकाच्या आधाराने 'नाग विदर्भ प्रदेश का स्वतंत्र भारत में योगदान' म्हणून एक छोटेसे पुस्तक काढले गेले. त्यावेळच्या टिपणांच्या आधारे वर्धा, आर्वी, हिंगणघाट तालुक्यांचा १९३५ पर्यंतचा इतिहास देण्याचा हा प्रयत्न.

**आर्वी तालुका**—१९०४ च्या बंगालच्या फाळणीनंतर या तालुक्यातील रामभाऊ अभ्यंकर (धनोडी), विनायकराव देशमुख (वाढोणा), नीळकंठराव देशमुख (विरूळ) ही मंडळी देशकारणात भाग घेत असत. स्वदेशी वस्तूंचा प्रचार व विलायती कापडाचा बहिष्कार येथे त्यावेळी बऱ्याच प्रमाणात पाळला जाई. सेठ सालिग्रामजींच्या प्रोत्साहनाने मोरस साखरेचा बहिष्कार झाला. नंतर सुरत येथे भरलेल्या काँग्रेसच्या ऐतिहासिक अधिवेशनाला वासुदेवराव देशमुख, रामभाऊ अभ्यंकर, महादेवराव होनाडे वगैरे मंडळी गेली होती.

होमरुल लीगच्या कारणे लो. टिळकांचा दौरा झाला त्यावेळी येथून दोन हजार रुपयांची थैली अर्पण करण्यात आली. ह्यावेळी पुरुषोत्तमराव चिपळूणकर, परशुरामपंत थत्ते, पंढरीनाथ बर्तक, सेठ खुशालचंद, वसंतराव कदम मंडळींनी फार परिश्रम केले होते. १९२० मध्ये आर्वी तालुका काँग्रेस कमिटीची पद्धतशीर स्थापना करण्यात आली. नागपूर काँग्रेसकरिता फंड जमविण्यासाठी एक कमिटी नेमण्यात आली. कलकत्ता जादा काँग्रेसच्या ठरावान्वये आर्वी, हिंगणघाट विभागातर्फे प्रांतिक कायदे कौन्सिलच्या निवडणुकीसाठी उभे असलेले उमेदवार नीळकंठराव देशमुख यांनी आपली उमेदवारी परत घेतली. १९२१ च्या मार्च महिन्यात आष्टी परगणा परिषद भरविण्यात आली. तिचे अध्यक्ष चंद्रपूरचे बळवंतराव देशमुख हे होते. परिषदेत जागच्या जागी दोन हजार रुपये टिळक स्वराज्य फंडासाठी जमले. खरांगणा येथे अर्जुनलालजी सेठी यांच्या अध्यक्षतेखाली परगणा परिषद भरविण्यात आली. अर्जुनलालजी, सुंदरलालजी व डॉ. हेडगेवार यांना परिषदेतील भाषणाबद्दल शिक्षा झाली होती.

तालुकाभर दारू-पिकेटिंगची चळवळ जोराने सुरू करण्यात आली. तिच्यावर दडपशाहीचा वरवंटा फिरू लागला. आर्वी येथे १९२१ साली लवाद कोर्ट आणि सूत काढण्याचा व खादी विणण्याचा कारखाना काढण्यात आला. बारा हजारांवर टिळक फंड जमविण्यात आला. १९२१ ते १९२३ मध्ये या तालुक्यात भिन्न ठिकाणी परिषदा झाल्या. तालुकाभर सतत चळवळ!

१९२७ साली या तालुक्यात खादी भांडार उघडण्यात आले. अस्पृश्य वर्गासंबंधाने १९२७, १९२८, १९२९ साली रघुनाथराव मांडे, थत्ते वगैरे मंडळींनी आस्थापूर्वक काम केले.

२६ जानेवारी १९३० रोजी तालुका काँग्रेस कमिटीने काँग्रेसच्या आज्ञेप्रमाणे सबंध तहसीलभर स्वातंत्र्य दिन पाळण्यात आला. १३ एप्रिल १९३० रोजी मिठाचा कायदेभंग करण्यात आला. कै. बानखेडे व रामभाऊ श्रोत्री यांनी हा सत्याग्रह केला व नंतर तालुकाभर या कार्यक्रमाची सुरुवात झाली. प्रांतिक युद्धमंडळाकडून जप्त वाङ्मयाच्या कायदेभंगाचा हुकूम आला. त्यात थत्ते वकील, श्रौती, डॉ. आपटे, नारायणराव बाघ, केशवराव भुसारी, कृष्णराव भोसले, मारोतराव जळीत, महादेवराव रानोडकार, शंकरलाल आचार्य यांनी भाग घेतला. तालुकाभर जप्त वाङ्मयाच्या ३० हजार प्रती छापून खेडोपाडी वाटल्या. वर्किंग कमिटीच्या फौजी आणि पोलीस शिपायांना उद्देशून निघालेल्या ठराव नंबर ६ च्याही हजारो प्रती छापून वाटल्या. हे काम चंपतराव पानबुडे यांचेकडे सोपविले होते. यानंतर ताराबाई पानबुडे, सौ. ताराबाई लिमये, कु. कमलाताई देशमुख यांच्या प्रयत्नांनी प्रभातफेऱ्या व कापडाचे पिकेटिंग करण्यात आले. एक महिन्यात दहा हजार रुपये किंमतीचे परदेशी कापड आर्वी येथे गोळा झाले. १ जून १९३० रोजी कु. विमलाताई अभ्यंकर (नरकेसरी अभ्यंकर यांची कन्या) यांचे हस्ते या कापडाची होळी करण्यात आली.

२६ जून १९३० रोजी आर्वी तालुक्यात आर्वी येथे स्वयंसेवक परिषद भरविण्यात आली. तळेगावला जंगल सत्याग्रहाची मुहूर्तमेढ रोवण्यात आली.

आर्वी तालुका काँग्रेस कमिटीने या सत्याग्रहाच्या केंद्रातील खर्चाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. गोपाळदास राठी यांनी शिबिराकरिता तळेगाव येथे जागा मिळवून दिली त्या जागेवर १७ जुलै १९३० रोजी (लो. टिळक यांच्या जयंतीच्या मुहूर्तावर) बिभूती महाराज यांचे हस्ते ध्वजारोहण करण्यात आले. याच जागेवर बाबासाहेब देशमुख यांचे अध्यक्षतेखाली प्रचंड सभा होऊन डॉ. खरे, ढवळे वकील, भोसले, वल्लभदास जाजू, चंपतराव पानबुडे यांची स्फूर्तिदायक भाषणे झाली. लो. टिळक पुण्यतिथी रोजी तळेगाव येथील सरकारी जंगलात कायदेभंग करण्याचे ठरविण्यात आले होते. हा सत्याग्रह ३० ऑगस्टपर्यंत चालूच होता. मधले सात दिवस वजा जाता २३ तुकड्यांनी सत्याग्रह केला व तेव्हापासून तळेगावचे नाव 'तळेगाव शिबीर' असे पडले. २ ऑगस्ट १९३० रोजी तालुका युद्धमंडळाचे बळीरामपंत जळीत यांना भुलथापीने आर्वीहून तळेगावला फक्त भेटीला बोलावण्यात आले व पोलीस ठाण्यात पकडून वर्ध्याला रवाना करण्यात आले. थत्ते, श्रोत्री यांना शिबिरातून १३ ऑगस्ट १९३० रोजी पकडले. ३ ऑगस्ट १९३० ला तळेगावचे प्रमुख नागरिक पांडुरंग इंगळे यांना पकडून शिक्षा ठोठावण्यात आली होती.

या मोहिमेत आर्वी तालुक्यात कमीत कमी पाचशेचेवर स्वयंसेवकांना अटक करण्यात आली. त्यापैकी २३९ जणांना शिक्षा ठोठावण्यात आली होती. सर्वांना मिळून ९,२७६ रुपये दंड ठोठावण्यात आला होता.

आर्वी, खरांगणा, कारंजा, आष्टी, जळगाव व भरसवाडा येथील एकूण ९७ कापड दुकान-दारांनी ६९ हजार रुपये किंमतीच्या विदेशी कापडाच्या गठ्ठयांना मोहरा लावल्या. बहिष्का-राच्या चळवळीसाठी मांडे वकील, नगरकर वकील, डॉ. आपटे यांची पोट-कमिटी नेमण्यात आली होती.

१३ एप्रिल १९३० रोजी जमनालालजी बजाज यांचे हस्ते गांधी चौकात तिरंगा झेंडा फडकविण्यात आला. म्युनिसिपालिटीच्या ठरावास अनुसरून बाबासाहेब देशमुख यांचे हस्ते म्युनिसिपल कचेरीवर तिरंगी झेंडा फडकविण्यात आला. लो. ना. बापूजी अणे यांचे हस्ते लोकलबोर्ड कचेरीवर झेंडा लावण्यात आला. आष्टी येथील सरकारी मिडलस्कूल वगळता तालुक्यातील सर्व शाळांवर राष्ट्रीय झडे फडकू लागले होते. खरांगणा, विरूळ, तळेगाव, आष्टी, कारंजा, जळगाव आदी गावांत निरनिराळ्या प्रमुख गृहस्थांकडून राष्ट्रीय ध्वजारोहण करण्यात आले होते.

वल्लभदासजी पकडले गेले, तेव्हापासून आर्वीत " बुलेटिन " सुरू झाले. त्याचे ७२ अंक व काही जादा अंक काढण्यात आले. ते १३ डिसेंबर १९३० पर्यंत सुरू होते.

१९३२ च्या दुसऱ्या युद्धाच्या सुरुवातीस बाबासाहेब देशमुख यांचे अध्यक्षतेखाली पुन्हा युद्धमंडळ स्थापन करण्यात आले. ते नागपुरास पकडले गेल्यानंतर डॉ. वानखेडे युद्धाध्यक्ष झाले. प्रांताध्यक्ष नरकेसरी अभ्यंकर यांना ९ जानेवारी रोजी पकडण्यात आले.

१६ फेब्रुवारी १९३२ रोजी वर्धा येथे अमानुष लाठीहल्ला करण्यात आला. आर्वी म्युनिसिपालिटीने २३ मार्च रोजी क्लॉथ मार्केटचे नाव बदलून त्याचे नेहरू मार्केट केले. २५ मार्च रोजी आर्वीचे कार्यकर्ते वल्लभदास जाजू यांचे घरास पोलिसांनी गराडा घातला व त्यांचे गैरहजेरीत घराची झडती घेतली. १९३० मध्ये प्रसिद्ध झालेले ' क्रांती की गझलें ' या पद्यावलीच्या दोन हजार प्रती जप्त केल्या होत्या.

म. गांधींच्या प्राणांतिक उपवासानंतर आर्वी तालुक्यात हरिजन चळवळीला सुरुवात झाली. हळूहळू विहिरी व देवळे अस्पृश्यांना मोकळी होऊ लागली.

१९३४ च्या प्रारंभी जमनालालजी बजाज यांनी वर्धा येथे प्रांतात जागृती करण्याचे उद्देशाने विदेशी वस्त्र-बहिष्कार मंडळ स्थापन केले. त्यांचा त्या संबंधात आर्वी तालुक्यात जानेवारी महिन्याच्या पूर्वार्धात आर्वी, खरांगणा व विरूळ येथे दौरा झाला.

१९३४ साली कॉंग्रेसच्या आज्ञेला अनुसरून नरकेसरी अभ्यंकर हे निवडणुकीला उभे होते. त्यांनीही या भागात दौरा केला होता. निवडणुकीनंतर मतांची मोजदाद झाली. त्यावेळी आर्वी तालुक्यातून अपेक्षेबाहेर बहुमत मिळाले होते.

खरांगणा केंद्रातील झामाजी व दगडूजी ; तळेगाव केंद्रातील इंगळे व त्यांचे सहकारी आणि कारंजा केंद्रातील केशवराव भुसारी, पांडुरंगजी वगैरे मंडळी कॉंग्रेसच्या हाकेला नेहमीच 'ओ' द्यायला तयार असत.

**हिंगणघाट तालुका.**—२६ जानेवारी १९३० चा स्वातंत्र्य दिन गोविंदराव खत्री यांचे अध्यक्षतेखाली पाळण्यात आला. पुरुषोत्तमराव देशपांडे (वकील) यांनी स्वातंत्र्याचा ठराव सभेतील पाच हजार लोकांकडून म्हणवून घेऊन पास केला.

१९२१ सालापासून हा तालुका कॉंग्रेसचा नेहमी पाठपुरावा करीत आला. या तालुक्यातील जागृतीचे श्रेय बहुतांशी नीळकंठराव घटवाई यांनाच जाते. १३ एप्रिल १९३० रोजी कमलाबाई

दातार यांचे अध्यक्षतेखाली १३० स्त्रियांनी मिठाचा कायदेभंग केला. त्याच रात्री घटवाई यांचे अध्यक्षतेखाली आचार्य विनोबाजी भावे यांनी गैरकायदा मिठाच्या सत्तर पुड्या विकल्या. या तालुक्यातील वरोडा, वडनेर, पोहना, अल्लीपूर या गावी घटवाई, बाबासाहेब देशमुख यांचे हस्ते मिठाच्या पुड्या विकण्यात आल्या. पुढे जप्त वाङ्मयाचा सत्याग्रह करण्यात आला. त्यात भीमनवार आदीकरून मंडळींनी प्रामुख्याने भाग घेतला.

पहिले सर्वाधिकारी वर्धाश्रमाचे श्री. ह. थत्ते होते. त्यानंतर युद्धमंडळ स्थापन झाले. त्याचे पहिले अध्यक्ष गोविंदराव खत्री होते. यानंतर डॉ. मुजुमदार यांनी चळवळीचे नेतृत्व पत्करले. नंतर देशसेविकाश्रम स्थापन करण्यात आला. त्यात ४० देशसेविका होत्या. स्वयंसेवक मंडळात १,२०० स्वयंसेवक होते. ९ मार्च १९३० रोजी परदेशी कापडावर पिकेटिंग सुरू झाले. विलायती वस्तू बहिष्कारामुळे ३६ इसमांवर खटले भरण्यात आले व त्यांना शिक्षा ठोठावण्यात आली. मालतीबाई थत्ते यांना जंगल सत्याग्रहास उत्तेजन देण्याबद्दल अटक करण्यात आली व पुढे शिक्षा झाली. बालवीर मुंजे यांना दंडाची शिक्षा झाली. दंड न दिल्यामुळे दोन महिने शिक्षा झाली. थत्ते यांना ३० सप्टेंबर १९३० रोजी अटक होऊन शिक्षा झाली. याच आरोपाखाली कृष्णराव देशपांडे व महादेवराव सोनकुसरे यांनाही शिक्षा ठोठावण्यात आली.

१६ ऑक्टोबर १९३० रोजी कुळकर्णी यांचे हस्ते प्रथम प्रदर्शन उघडण्यात आले. २१ नोव्हेंबर १९३० ला दुसरे प्रदर्शन डॉ. मुजुमदार यांचे हस्ते उघडले. दिवाळी संपल्यावर कापड व्यापाऱ्यांनी सील तोडून विदेशी कापडाचे गठ्ठे मोकळे केले म्हणून पिकेटिंग सुरू झाले. तीन इसमांनी दोन दिवसपर्यंत उपवास केला. शेवटी बेमुदत सील लावण्यात आले. २९ जुलै १९३० पासून दारू-पिकेटिंग सुरू झाले. त्यामुळे दारू विक्री अजिबात बंद झाली.

कौन्सिल पिकेटिंगच्या वेळी—१० नोव्हेंबर १९३१ रोजी पोलिसांनी तीन वेळा लाठीहल्ला केला. दोन इसम घायाळ झाले.

दुसऱ्या युद्धात—४ जानेवारी १९३२ रोजी म. गांधी यांना पकडल्यानंतर तालुक्यातील चळवळीने पुन्हा उचल खाल्ली. हिंगणघाट तालुक्यातील पहिली धरपकड १९ जानेवारी १९३२ रोजी झाली.

८ मार्च १९३२ ची सभा विशेष महत्त्वाची ठरली. शिवनी जेलमध्ये पुनमचंदजी रांका यांनी राजकीय कैद्यांच्या वर्गीकरणाच्या निषेधार्थ उपवास सुरू केला होता. त्यांच्याबरोबर हिंगणघाट तालुक्याचे पहिले डिक्टेटर डॉ. मुजुमदार यांनीही सहानुभूतीपर उपवास सुरू केला होता. तेव्हा ह्या सभेत सरकारवर सडकून टीका करण्यात आली व अत्याचाराचा निषेध नोंदविला.

**वर्धा तालुका.**—राष्ट्रीय महासभेची स्थापना झाल्यापासून तिला वर्धा जिल्ह्यातून प्रतिनिधी गेल्याचे आढळतात. नागपूरच्या लोकसभेची तसेच गोरक्षण सभेची एक शाखा येथे होती. लक्ष्मणराव अत्रे हे लो. टिळक यांच्या अनुयायात मोडत.

१९०४ च्या बंगाल फाळणीच्या वेळी या तहसिलीत जोराची चळवळ झाली. स्वदेशी व बहिष्काराचा ध्वनी तालुकाभर पसरला व अनेकांनी स्वदेशीच्या शपथा घेतल्या. पांडुरंग

सदाशिव खानखोजे वगैरे मंडळींनी विद्यार्थीदशेतच देशसेवेस वाहून घेण्याचे व्रत पत्करले. नीळकंठराव देशमुखांच्या अध्यक्षतेखाली तरुणांचे "कृषिक मंडळ" स्थापन झाले. याच सुमारास वर्धा जिल्ह्यात 'मालगुजारी सभा' स्थापन झाली होती.

तु. ज. केदार, मनोहरपंत देशपांडे, हरि कृष्ण उपाख्य, आप्पाजी जोशी, डॉ. गंगाधरराव देशमुख, गोविंदराव पांडे आदी वकील मंडळी राजकारणात लक्ष घालू लागली होती. लोकमान्यांच्या होमरूल चळवळीत हा तालुका अग्रेसर होता. प्रचारकार्यासाठी 'सुमति' पत्र काढण्यात आले. एकट्या तुकाराम वसू यांनी ६०० सभासद नोंदले.

१९२० साली येथील अनेक वकिलांनी वकिली सोडली. आचार्य विनोबा भावे यांच्या प्रमुखत्वाखाली वर्धा येथे सत्याग्रहाश्रम स्थापन झाला होता. सरकारी व निमसरकारी शाळांतून १,२०० विद्यार्थ्यांनी असहयोगाच्या कार्यक्रमाला अनुसरून शाळा सोडल्या. त्यामुळे तालुक्यात एकंदर बावीस राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या. मारवाडी हायस्कूलने सर्वस्वी राष्ट्रीय शिक्षणाचा अभ्यासक्रम सुरू केला. तालुक्यात सोळा ठिकाणी लवाद कोर्टे स्थापन झाली.

१९२१ मध्ये तालुक्यात ७,९४६ काँग्रेस सभासद नोंदले गेले होते. जमनालालजी बजाज यांची एक लाखाची देणगी सोडून १७,८७० रुपये पावणे सात आणे टिळक स्वराज्य फंड जमा झाला होता. तालुक्यात १,३८१ चरखे चालू झाले. ह्याशिवाय हिंगणी व आंजी येथे ६५५ शेर सूत काढण्यात आले होते. १,१०५ वार खादी तयार झाली. परदेशी कापड बोलावणार नाही, अशा १०३ कापड दुकानदारांनी प्रतिज्ञा केल्या. निव्वळ खादीच विकणारे एक भांडार निघाले. या तालुक्यातील पाच मॅजिस्ट्रेटांनी मॅजिस्ट्रेटी सोडल्या. ३० गावात परदेशी कापडाच्या होळ्या झाल्या. दारू पिकेटिंग झाले.

वर्धा येथे प्रत्यक्ष कायदेभंगाच्या लढाईला २७ एप्रिल १९३० रोजी तोंड लागले. थत्ते यांच्या अध्यक्षतेखाली दहीहंड्यावरून आणवलेल्या खाऱ्या पाण्याचे कन्हय्यालाल भैय्या, आडकोबा पटेल, तेजराम गहलोत आदी मंडळींनी कायदा मोडून मीठ तयार करून विकले.

राजद्रोही वाङ्मय वाचण्याचा कायदेभंगाचा कार्यक्रम हाती घेण्यात आला. परदेशी कापड, दारू व ताडीवर पिकेटिंगची मोहीम काढण्यात आली. तालुकाभर तिची विक्री मंदावली.

असहकारितेचा पुरस्कार करण्यासाठी सत्यदेव विद्यालंकार यांचे संपादकत्वाखाली 'राजस्थान केसरी', नीळकंठराव देशमुखांच्या संपादकत्वाखाली 'सुबोध माला', तर वामनराव घोरपडे यांचे संपादकत्वाखाली 'तरुण भारत' ही वृत्तपत्रे वर्ध्याहून निघू लागली. विनोबाजींनी 'महाराष्ट्र धर्म' मासिक सुरू केले.

१९२३ साली झेंडा सत्याग्रह सुरू झाला.

१९२४–२५ साल काँग्रेसच्या परस्परविरोधी राजकीय पक्षांच्या खेचाखेचीत गेले. तथापि जमनालालजी बजाज पक्षाचा विजय होऊन प्रांतिक काँग्रेस कमिटीची मुख्य कचेरी वर्ध्यास आणण्यात आली. याच सुमारास ब्राह्मण-ब्राह्मणेतर भावनेने जोर धरला व येथे ब्राह्मणेतर परिषद भरून रा. ब. नायडू यांच्या नेतृत्वाखाली पक्ष स्थापन झाला.

तळेगावच्या जंगलसत्याग्रहासाठी ८ जुलै रोजी श्रीधरराव दाते यांच्या आधिपत्याखाली एक तुकडी पाठविण्यात आली होती. त्यात ३–४ महिन्यांची शिक्षा झाली. २ ऑगस्ट १९३० रोजी वर्धा येथे युद्धमंडळ स्थापन झाले. शिवराजजी अध्यक्ष होते. तालुक्यात चुडीवाले, पिंजरकर, कन्हय्यालाल भैया यांनी व्याख्यानांचा दौरा केला. २५ ऑगस्ट रोजी तीन ठिकाणी सामुदायिक जंगलसत्याग्रह करण्यात आला.

२ सप्टेंबर १९३० रोजी साळवे वकील यांच्या अध्यक्षतेखाली स्वयंसेवक परिषद भरली. दुसऱ्या दिवशी बॅरि. गोविंदराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली मालगुजार व मुकादमांची परिषद झाली. ७ सप्टेंबर १९३० रोजी केळझरच्या जंगलात ५०० लोकांसह युद्धमंडळाचे अध्यक्ष चिरंजीलाल यांनी सत्याग्रह केला. त्यावेळी २० हजार लोक जमले होते. तेव्हा ९६ लोकांना पकडून ४६ जणांवर खटले भरले. ८ सप्टेंबर रोजी गढवाल-दिन पाळण्यात आला. सालईचा दुसरा सत्याग्रह १५ सप्टेंबर १९३० रोजी भर पावसात झाला. तेव्हा पोलिसांनी लाठीमार केला.

याच सुमारास कायदे कौन्सिलच्या निवडणुका झाल्या. नानाजी लोटलीकर यांच्या नेतृत्वाखाली पिकेटिंग झाले. त्यात स्त्रियांनीही भाग घेतला होता. फक्त शेकडा १२ मतदारांनी मते दिली. लोटलीकर आदी मंडळींना शिक्षा झाली. नंतर अबकारी लिलावाचा प्रसंग उद्‌भवला. पिकेटिंग झाले. त्यात गुलाबबाई, केशरबाई, लक्ष्मीबाई, चंद्राबाई, गंगाबाई भुसारी यांनी भाग घेतला. लिलावात सरकारला ४० टक्के तूट आली.

डिसेंबर महिन्यात निरनिराळ्या जातींच्या सुमारे एक हजार स्त्री-पुरुष स्वयंसेवकांनी सहभोजनाचा समारंभ केला. सेठ जमनालालजी, दे. भ. अभ्यंकर, नीळकंठराव देशमुख सुटून आल्यावर वर्धेकरांनी त्यांचे प्रचंड स्वागत केले.

नंतर वानरसेना, मांजरसेनाही निर्माण झाल्या. श्रीकृष्णदास जाजू यांनी खादी प्रचाराचे काम संघटित केले.

वानरसेनेची महत्त्वाची कामगिरी शिरगणतीच्या बाबतीतील 'कायदेभंग' ही होय. त्यांचे तीन कप्तान पकडण्यात आले. कमलनयन बजाज व १४ मुलांना पकडून सोडून देण्यात आले. प्रल्हाद पोद्दार (वय १६) व बुद्धसेन (वय १२) यांना ट्रेसपासखाली जेलमध्ये रवाना करण्यात आले. तालुका युद्धमंडळातर्फे शिरगणतीचा बहिष्कार-दिन पाळण्यात आला. जंगी मिरवणूक काढण्यात आली. तीत जानकीदेवी बजाज आपल्या मुलींसह मिरवणुकीत सामील झाल्या होत्या.

१९३२ सालची या तालुक्यातील युद्धाची मोहिम तालुक्यात शिबिरे स्थापन करण्यापासून झाली. त्याचा उपक्रम सत्याग्रहाश्रमाच्या मंडळीकडून झाला. ७ जानेवारीपासून तेजरामजी यांच्या नेतृत्वाखाली दारूच्या गुत्त्यांवरील पिकेटिंग सुरू झाले. त्याचबरोबर विदेशी कापडा-वरील पिकेटिंगचे काम गणपतराव उमरे यांच्या नेतृत्वाखाली सुरू झाले होते. यावेळी बरीच धरपकड झाली.

१७ फेब्रुवारी १९३२ रोजी काशिनाथराव महाकाळकर यांच्या नेतृत्वाखाली पाच हजार लोकांची मिरवणूक निघाली. दारू दुकानासमोरील चौरस्त्यावर राष्ट्राधिकारी सरदार

शार्दूलसिंगांचा संदेश वाचून दाखविण्यात आला. त्यावेळी लाठीबाज पोलिसांसह सब्-डि. मॅजिस्ट्रेट डोंगरे हजर होते. त्यांनी जनतेला पांगापांग करण्याबद्दल हुकूम दिला. तो हुकूम न ऐकल्यामुळे लोकांवर लाठीहल्ला झाला. १७ स्त्रिया, २२ मुले-मुली व ५५ पुरुष घायाळ झाले. १८ जणांना गिरफ्दार करण्यात आले. तेजरामजी व डॉ. बऱ्हाडपांडे यांनाही पकडण्यात आले. काही दिवसांनी पुनश्च लाठीचार्ज करण्यात येऊन बेदम मारण्यात आले. रामादीन नावाचा स्वयंसेवक फार घायाळ झाला. पण लोक घाबरले नाहीत. लगलीच एक दिवस जिल्हा कचेरीवर, सर्व कचेऱ्या चालू असताना जिल्हा कोर्टाच्या इमारतीवर एकाएकी कॉंग्रेसचा झेंडा फडकू लागला. इमारतीवर चिन्ना पहेलवान होता. त्याला गिरफ्दार करण्यात आले.

१९३२ साली वर्धा तालुक्यात सेलू, पुलगाव व देवळी येथे शिबिरांची स्थापना करण्यात आली. वर्ध्याचा सत्याग्रहाश्रम जप्त करण्यात आला. जमनालालजींच्या बगीचातील हजारो रुपये किंमतीच्या इमारती ऑर्डिनन्सच्या वरवंटयाखाली जप्त करण्यात आल्या.

१९३२ साली वर्धा तालुक्यातून सरासरी ५०० पुरुष व ७५ स्त्रिया तुरुंगात गेल्या. त्यांपैकी ४० वर्धा शहरातल्या होत्या. ३५ तालुक्यातील होत्या.

सत्याग्रहाश्रमाचे बाबाजी मोघे, तेजरामजी व आश्रमाच्या मंडळींनी जंगलसत्याग्रहाचे नेतृत्व स्वीकारले होते.

व्यक्तिगत सत्याग्रह शिथिल झाल्यावर जमनालालजी बजाज यांनी विदेशी वस्त्रबहिष्काराला हात घातला. ह्या चळवळीत पिकेटिंगचा समावेश नव्हता, तरी राधाकृष्ण बजाज यांच्या नेतृत्त्वाखाली नऊ जणांचे पथक पकडण्यात आले. त्यात हरिभाऊ मोहनी व छोटेलालजी होते. त्यांना मार्चमध्ये शिक्षा झाली. त्यांनी कोर्टात बचाव केला. १९३३ च्या व्यक्तिगत सत्याग्रहात २८ जणांना शिक्षा झाली होती.

म. गांधींनी १९२५ मध्ये अ. भा. ग्रामोद्योग संघाची स्थापना केल्यावर त्याचे मुख्य केंद्र तसेच त्यांचे स्वतःचे निवासस्थान त्यांनी वर्धा हे केल्यापासून वर्ध्याकडे सगळ्या जगाची दृष्टी लागली. दृष्ट मात्र कोणाचीच लागली नाही. या औत्सुक्याच्या, आशीर्वादाच्या, अपेक्षांच्या दृष्टीने वर्धा १९२० पासून पुढे पुढे आणि पुढेच येत गेले !

येथपर्यंत वर्धा तहसिलीच्या मुक्ती-कार्यावर भर देण्याचे एक महत्त्वाचे कारण आहे. या मुक्ती-इतिहासात ज्यांची नावे नमूद केलेली दिसतात ती मंडळी पुढे गांधीजींचा कॉंग्रेसवर प्रभाव जसजसा पडू लागला तसतशी वेगळी झाली. काही अन्य पक्षातही सामील झाले. पण लो. टिळकांच्या दोऱ्यानंतर स्वराज्यासाठी जी जागृती झाली त्यात केवळ देशभक्तीच्या भावनेने केवढे काम झाले होते, याचे दिग्दर्शन म्हणून होऊ शकते. बरीचशी मंडळी कॉंग्रेसच्या विरोधातही गेली, म्हणून त्यांचे देशप्रेम-देशभक्ती खरी नव्हती असे म्हणणे योग्य नाही. भावभावनेच्या आहारी जाऊन कोणी देशासाठी काय केले, किती केले असा हिशेब मांडणे चूक आहे. जे पुढे गेले त्यांना वंदन ! ज्यांना जाता आले नाही त्यांनाही वंदन !

पुढे व पुढेच जाऊन सरकारच्या विरोधात सामील होऊन अंतरीच्या त्यागभावनेने देशकार्यात सामील झाली होती त्यांची त्रोटक उपलब्ध माहिती देणे योग्य वाटते. मतभेदातीत राष्ट्रीय एकात्मतेला ते पोषकच होईल.

जागरणाच्या काळात राजदंड, राजकैद ज्यांनी सोसली त्यांची नोंद घेणे ऐतिहासिक दृष्टीने आणि देशविकासाच्या दृष्टीने आवश्यक आहे. हा त्याग चार-दोन मंडळींनी केला असता तर नामसंकीर्तनाचे पुण्य नक्कीच पदरात पाडून घेता आले असते. विष्णुसहस्रनामात ईश्वराची एक हजार नावे आहेत. 'यानि नामानि गौणानि' म्हणजे गुणवाचक नावे आहेत. पण ईश्वर असंख्य असंख्य नामांचा आहे. 'तू अनंत तुझी अनंत नामे' हेच खरे! नामसंकीर्तनावर जबाबदारी येत नाही. संकीर्तनाने स्नान घडते, असे विनोबाजी म्हणतात. राजबंद्यांच्या नावात असेच स्नान घडेल, ही भावना! पण ही यादी नागपूर प्रांतापुरती मर्यादित, पण संख्या मोठी. नामांवर पुटांवर पुटे देऊन देऊनच संख्येचा निर्देश करायचा आहे. शिवाय नावांची नोंद अपुरी व १९३२ पर्यंतच आहे.

**१९२१ ते १९३२ पर्यंत राजबंद्यांची संख्या**

| | | |
|---|---|---|
| (१) | नागपूर शहर | १,०५३ |
| (२) | नागपूर : एकटे टिळक विद्यालय | ९५ |
| | | १,१४८ |
| (३) | नागपूर तालुका | ६९ |
| (४) | सावनेर तालुका | १३० |
| (५) | काटोल तालुका | ६७ |
| (६) | रामटेक तालुका | ११२ |
| (७) | उमरेड तालुका | १३७ |
| | | ५१५ |
| (१) | वर्धा जिल्हा | ५६४ |
| (२) | आर्वी तालुका | २९४ |
| (३) | हिंगणघाट तालुका | १३० |
| | | ९८८ |
| (१) | चंद्रपूर जिल्हा | ५३ |
| (२) | चंद्रपूर तहसील | १७६ |
| | | २२९ |
| (१) | भंडारा जिल्हा | ३१३ |
| | एकूण | ३,१९३ |

यात मुद्दाम एक लक्षणीय संख्या दिलेली नाही. वरील राजबंद्यांच्या यादीत केवळ पुरुषांचा समावेश आहे. नामनिर्देश इतका लोभस आहे की, ईश्वरनामच आठवावे ! काही नावे ठळक दिली आहेत. जसे श्री. जमनालालजी बजाज, विनोबा भावे, बॅरि. मोरोपंत अभ्यंकर ही नावे थोरांची आहेत; वंदनीय आहेत, हे खरे. पण माधो, पैकू, फकीरा, बारशा, काळू, मार्कंडी, झिबला, डोमा, नामा या नावांचे काय ? शब्दाला अर्थ माणूस देतो. शब्दाचा पहिला अर्थ ईश्वर आणि दुसरा अर्थ वस्तू, असे विनोबाच म्हणायचे. त्यामुळे उपरोक्त नामांतून पहिला अर्थ काढणे चांगले ! शिवाय या सबंध यादीत जाती, जमाती, पक्ष, पंथ, धर्म सर्वच एकमेकांत मिसळून गेले आहेत. अनेकातून एक आणि एकातून अनेक, असे काहीसे वाटून जाते.

वरील सर्व नावे या नामावलीत १९३० ते १९३२ पर्यंत आली असावीत. कारण कॉंग्रेस ज्युबिलीचा इतिहास सन १९३५ मध्ये लिहिला गेला. इथून वर्ध्याचा इतिहास किंबहुना नागपूर प्रांताचा इतिहास हा अखिल भारताचाच इतिहास होऊन जातो. सन १९३२ ते १९४० या अवधीतली सरकारविरोधीची चळवळ, सन १९३५ चा कायदा, कॉंग्रेस मंत्रिमंडळाची स्थापना—सगळे सुरळीत होणार होते. पण ब्रिटिशांनी एक मेख मारून ठेवली होती, ती कम्युनल अवार्डची ! जनतेला तो पटवून देण्यात आपल्या पुढाऱ्यांना खूपच परिश्रम पडले. सर्व कसे रीतसर घडेल, अशी अपेक्षा होती. आशा-आकांक्षांच्या जलधारा, वासलेल्या चोचीत पडतील असे वाटू लागले होते. पण हे वाटणे तात्पुरतेच !

सन १९३९ मध्ये दुसरे जागतिक महायुद्ध सुरू झाले. "इंग्रजांची अडचण ही भारताची संधी" या दृष्टीने विचार सुरू झाले. पहिल्या महायुद्धात लो. टिळकांनी असाच विचार मांडला होता. आणि तरुण मने या वेळेपुरती टिळकांच्या मनाची झाली होती. पण म. गांधींचे व्रत अहिंसेचे ! या अहिंसेमध्ये शत्रूला मित्रच मानावे लागते. एवढेच नव्हे तर शत्रूच्या शत्रूलाही मित्रच मानावे लागते. राज्यकर्ते संकटात आहेत, त्यांना अडचण नको, हे म. गांधींचे विचार. त्यावेळी वर्ध्याच्या बजाजवाडीमध्ये कॉंग्रेस वर्किंग कमिटीची जी बैठक झाली त्यात बरेच आवाज चढले. म. गांधी शांत होते. कारण त्यांची स्वराज्याची व्याख्याच आगळी वेगळी ! हिंसेने साम्राज्य मिळाले तरी ते त्यांना नको होते. साम्राज्यच काय पण 'पारमेष्ट्यं राज्यं' त्यांना नको होते. धर्मराजासारखी अहिंसेने मिळालेल्या पाच गावांचीही त्यांची तयारी होती. कारण धर्मनिष्ठेमुळे या पाचांवर असंख्य शून्ये चढविण्याची त्यांची ताकद होती. अहिंसा हे वीराचे काम. धैर्याचे काम. निर्भर, निर्वैर अशी राज्यव्यवस्था त्यांना हवी होती.

म्हणून ते शांत होते. पं. नेहरू, वल्लभभाई अशांत होते. त्यांचे तगमगीने विकल झालेले चेहरे ज्यांनी बघितले ती माणसे आजही जिवंत आहेत. पण अखेर या भारताच्या संस्कृतीत तरी, या भीष्माच्या भारतात तरी जय होतो तो धर्माचा ! म. गांधींनी प्रतीकात्मक सत्याग्रहाची कल्पना मांडली आणि पहिला सत्याग्रही म्हणून विज्ञानी, प्रज्ञावंत विनोबांची निवड केली. साधा राज्यव्यवहार. पण म. गांधींच्या या निवडीने कसा ऊंच ऊंच होऊन गेला. पू. विनोबाजीं नंतर जे तुरुंगात गेले त्यांचीही उंची वाढली. त्यांची नावे देण्याची प्रस्तुत मर्यादेत शक्यता नाही.

नंतर अंतिम लढा १९४२ चा ! हे अखेरचे युद्ध !

'किंबहुना तृषिता लागी । पाणी आरायिले जगी'

ही भारताची संस्कृती ! पण हे पाणीच जेव्हा पेटते, जेव्हा उफाळते—वाफेला येते तेव्हा करायचे काय ? एकाचे अनेक, अनेकाचे अनेक अनेक. सगळेच अनंत ! अवघा भारत पेटला. गांधीजींनी २० जून १९४२ ला आपल्या अंतेवासियांना सांगितलेच होते, ' हे माझ्या प्रियजनांनो, हा अंतिम लढा आहे. अहिंसक लढ्याला जनता तयार नाही. या लढ्यात हिंसा होणार आहे. मला दिसते आहे. पण अंतिम लढाई मागे घेता येत नाही. अहिंसा हे व्रत आहे. तुमच्याकडून माझी एकच अपेक्षा आहे.—जिथे जिथे म्हणून हिंसा घडेल तिथे तिथे अहिंसेवर नितांत विश्वास असलेला एकही मनुष्य मजकडे जिवंतपणी हे मांगायला येता कामा नये की, ' बापू, येथे हिंसा घडत आहे. '

असा हा अंतिम लढा ! किती गेले, किती राहिले असा हिशेब अखेरच्या वेळी करायचा नसतो. शेकडो—हजारो—लाखो—त्यांच्या त्यागाची नोंद करता येत नाही. महायज्ञात समिधांची नोंद होत नसते. नोंदच करायची झाली तर अखिल भारताची करावी लागेल. भारतातील प्रत्येक प्रांताने, प्रत्येक शहराने, प्रत्येक गावाने, प्रत्येक खेड्याने आणि रानावनात राहणाऱ्या माणसानेही या महायज्ञात समिधा टाकल्या. त्यात एखाद्या गावाचा, शहराचा वाटा, त्याचा हक्क सांगणे हे कार्पण्य ! पापच ! जगण्याची कला मरण्याचे रहस्य समजून घेतल्या-शिवाय कधीच आत्मसात करता येत नाही. मृत्यूला सामोरे जाणे हे धैर्य; मृत्यूचा हिशेब करणे हा प्रसाद !

म्हणून अल्पशा नामावलीवर आपण पुण्य साधायचे ! हजार नावे ज्यांना घेता येत नाहीत त्यांना माझे एक नाव घेतले तरी तेवढेच पुण्य मिळते हे भगवंतानेच सांगितले आहे. ईश्वराने दिलासा दिला ! अहो भाग्य !

वरील ३,१९३ नामांमध्ये आणखी समाविष्ट करावयाची नावे फक्त १९९ आहेत. त्यांची नामावलीच देणे भाग आहे. नाहीतर स्त्रीचे ब्रह्मचर्य, समानता यांचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रपित्याचा आणि स्त्री-रक्षणार्थी असू नये, असे प्रतिपादन करणाऱ्या गुरूचा द्रोह करण्या-सारखे होईल. ही नामावली स्त्रियांची आहे. स्त्रीची पूजा—

' शिव : शक्त्या युक्तो यदि भवति शक्त : प्रभवितुं ।
न चे देवं देवो न खलु कुशल: स्पन्दितुमपि ।। '

—ईश्वरालाही शक्तीच्या रूपात करावी लागते. साधुसंत मातेच्या रूपात ती करतात. संत तुकारामाने तर विठोबालाच ' माऊली ' म्हणून टाकले आहे. संतांची श्रीज्ञानेश्वर माऊली प्रसिद्धच आहे. पुरुषाला शक्ती जोडली तर दोघांच्याही शक्तीची पट भूमितीप्रमाणाने वाढते. यास्तव या शक्तीचे नामसंकीर्तन करावेसे वाटते. शिवाय विस्तारभयाचा संकोचही नाही. कारण ही नावे ' तयामाजी अति सुगमे ' अशीच आहेत.

## स्त्री राजबंद्यांची नावे

### नागपूर

(१) सौ. अनसूयाबाई काळे
(२) सौ. सरस्वतीबाई छत्रे
(३) सौ. रमाबाई छत्रे
(४) सौ. सरस्वतीबाई टिकेकर
(५) लक्ष्मीबाई देऊस्कर
(६) सौ. लक्ष्मीबाई दातार

## स्त्री राजबंद्यांची नावे—नागपूर

(७) सरस्वतीबाई जोगळेकर
(८) सौ. चंपाबाई भरूका
(९) अंजिराबाई देशमुख
(१०) यशोदाबाई देशमुख
(११) भीमाबाई जोशी
(१२) सौ. सुशीलाबाई गाडगीळ
(१३) सौ. शांताबाई माचवे
(१४) गोदुबाई जोगळेकर
(१५) सौ. सगुणाबाई कानेटकर
(१६) तुळसाबाई गिऱ्हे
(१७) रमाबाई घाटे
(१८) सीताबाई बाक्रे
(१९) सीताबाई आठले
(२०) सौ. विद्यावती देवडिया
(२१) गंगाबाई चोबे
(२२) चतुराबाई कोटक
(२३) पार्वतीबाई
(२४) अंजिराबाई चव्हाण
(२५) सौ. लक्ष्मीबाई जागोबाजी
(२६) यशोदाबाई सीरिया
(२७) मराठे
(२८) साळूबाई
(२९) राधाबाई
(३०) मनाबाई
(३१) गंगूबाई मराठे
(३२) बजाबाई
(३३) काशीबाई पंडित
(३४) लीलावतीबाई
(३५) सुमित्राबाई
(३६) सौ. गंगाबाई तिडके
(३७) गंगाबाई महाजनीन
(३८) भागाबाई
(३९) किसनाबाई चोपडे
(४०) गुजाबाई खरकाटीन
(४१) कमळजा पाटलीन
(४२) भीमाबाई पाटलीन
(४३) सखुबाई कारीन
(४४) ठसोबाई धन्नालाल कहार
(४५) यशोदाबाई नवलसिंग
(४६) लीलाबाई धन्नालाल
(४७) रंगू मोतीराम कलार
(४८) रंगूबाई ब्राह्मण
(४९) रखमाबाई
(५०) सोनी मारोती सोनार
(५१) भीमा माळीन
(५२) लहानूबाई म्हालीन
(५३) कु. विमल अभ्यंकर
(५४) कु. सरोजिनी अभ्यंकर
(५५) सौ. मनोहर
(५६) दीक्षित
(५७) जोशी
(५८) शारदाबाई गद्रे
(५९) कमलाबाई हॉस्पेट
(६०) वाराणसीबाई माटे
(६१) खंडारकर
(६२) सौ. गंधे
(६३) धनवटे
(६४) इंदिराबाई काळी
(६५) बयाबाई काळे
(६६) तुळसाबाई खंडेलवाल
(६७) ताराबाई तेलीण
(६८) आक्का भिडे
(६९) राधाबाई इमारते
(७०) दुलीबाई केळ
(७१) सौ. चंपाबाई पिंगे
(७२) आण्याबाई पडोळे
(७३) साळूबाई
(७४) मिलीबाई बालाजी
(७५) चंद्रभागाबाई बालाजी
(७६) सोनाबाई परदेशीण
(७७) पार्वतीबाई सालेवार
(७८) कु. साखरदांडे
(७९) सौ. चंद्रभागाबाई पटवर्धन

## वर्धा जिल्ह्यातील तुरुंगात गेलेल्या स्त्रिया

(१) जानकीबाई बजाज
(२) केशरबाई पोतदार
(३) दुर्गाबाई बजाज
(४) चंद्राबाई पाठक
(५) ललिताबाई चौरे
(६) लक्ष्मीबाई धानुका
(७) नर्मदाबाई भय्या
(८) मालतीबाई थत्ते
(९) शांताबाई काळे
(१०) गंगूताई वाळुंजकर
(११) शरयूताई धोत्रे
(१२) गीताबाई बेले
(१३) राधाबाई कोष्टी
(१४) विमलाबाई जोग
(१५) सखुबाई तेली
(१६) आवडाबाई
(१७) कृष्णाबाई चव्हाण
(१८) गंगूबाई दुर्गे
(१९) लक्ष्मीबाई बागडदेव
(२०) गंगूबाई कृष्णपक्षी
(२१) विठाबाई बंजारे
(२२) रंगूबाई देशकर
(२३) लक्ष्मीबाई कावळे
(२४) सखुबाई कोष्टी
(२५) भागेरथीबाई मराठे
(२६) साळूबाई आगलावे
(२७) बयाबाई खरणकर
(२८) रखमाबाई भूलकर
(२९) गंगूबाई रोडे
(३०) राधाबाई मराठे
(३१) चंद्रभागाबाई मुंजे
(३२) मनाबाई गोंड
(३३) कलाबाई गोंड
(३४) अन्नपूर्णाबाई मीटकर
(३५) मनाबाई सोनार
(३६) कमलाबाई सोनार
(३७) कमलाबाई कुणबी
(३८) कामिनीबाई वानखेडे
(३९) उमाबाई कृष्णपक्षी
(४०) जानकीबाई मोरे
(४१) सोनाबाई बागडदेव
(४२) सखुबाई जाधव
(४३) मनाबाई जाधव
(४४) रंगूबाई
(४५) सोनाबाई
(४६) भीमाबाई
(४७) गजाबाई
(४८) सरस्वतीबाई
(४९) गयाबाई
(५०) गंगूबाई
(५१) ताईबाई
(५२) लंकाबाई
(५३) तानाबाई
(५४) सीताबाई
(५५) पार्वतीबाई
(५६) अंबिकाबाई
(५७) सोनाबाई
(५८) मंजुळाबाई
(५९) यशोदाबाई
(६०) कमलाबाई
(६१) लक्ष्मीबाई
(६२) अनसूयाबाई
(६३) पिलाबाई
(६४) सीताबाई वाघ
(६५) कपुराबाई गोंड
(६६) काशीबाई वाणी
(६७) सुभद्राबाई रोहणी
(६८) लक्ष्मीबाई देशमुख
(६९) सारजाबाई
(७०) तानाबाई सोनार
(७१) सखुबाई कोष्टी
(७२) मनाबाई पुंजाराम वाद

वर्धा जिल्ह्यातील तुरुंगात गेलेल्या स्त्रिया

(७३) पिलाबाई
(७४) द्रौपदीबाई
(७५) राधाबाई
(७६) चिमनाबाई
(७७) गुणाबाई
(७८) सरस्वतीबाई जुवाडी
(७९) बायजाबाई

योगायोग बघा ! नागपूर व वर्धा दोहींचा आकडा एकच आहे, एकोणऐंशी !

ही माता-भगिनींची नावे, आया-बहिणींची नावे, लेकी-बाळींची नावे, विविध नामांचा आविष्कार; काही सौभाग्यवती आहेत. काहींच्या मागे 'कु.' आहे. प्रणामांजलीच्या वेळी एक विचार मनात येतो. ही नावे पन्नास वर्षांपूर्वीची आहेत. यातील बहुतेक नामशेष झाली असतील. काही असतील. काही आशीर्वादाचे धनी झाली असतील. काहींनी पिल्या लेकराला सोडून बंदिवास पत्करला असेल. काहींची गत 'शिवलीलामृता' तल्या हरिणीसारखी झाली असेल आणि व्याधाने त्यांचे काही एक ऐकले नसेल !

दुसरा विचार मनात येतो—यांची लेकरे असतील, सुना असतील, लेकीबाळी नांदत्या घरी असतील, नातवंडे असतील. जिथे असतील तेथे सुखी असोत. तानाबाई, बजाबाई, रंगूबाई अशा कित्येक नावांची नीटशी माहितीही नाही. अनामिक. खरोखरच अनामिक ! झंझावातात वृक्षाची पालवी गळावी तेवढ्यापुरता टप्‌टप्, सळसळ आवाज व्हावा आणि परत वाऱ्याच्यावावटळीने कुठेतरी ती पाने उडवून द्यावीत. पण एका विशिष्ट मुलाला एका विशिष्ट नातवंडाला एक विनंती करावीशी वाटते की बाबारे, अशीच एखादी तानाबाई तुझी आई असेल, आजी असेल, पणजी असेल ! तिची तू तरी याद ठेव ! ! कधीतरी तिचे नाव घे. आम्ही शक्तीरूपेच नाव घेणार ! तू मात्र आप्तरूपाने घे ! असे केल्याने काय होईल ? शक्तीच्या शपथेनेच सांगतो—तुझी इडापिडा टळेल आणि कुठल्यातरी मंदमंद प्रकाशाने तुझा आसमंत उजळून निघेल. तुझ्या पूर्वजाकडून एक पुण्यकर्म घडले ; त्याच्या आठवणीने तूच उजळून निघशील. आजवर तू विचार केला त्यावरून मोठे विचार तुझ्या भावनेत भरतील आणि या मोठ्या विचारांच्या ओझ्याने खोटे विचार चिरडले जातील.—विश्वास तर ठेवून बघ ! जेव्हा काही तरी जळते तेव्हाच काही तरी उजळते !

---

# उज्ज्वल जमनालालजी

मनात सततची एक खंत होती; अजूनही आहे. आणि आता तर ती अधिकच डाचत आहे. चाळीस वर्षे झाली—ती खंत निघत नाही. मनात येते की आपण वर्ध्याला आलो ते काकाजींमुळे —काकाजींसाठी नव्हे ! त्यांच्यापासून आपण जे घेतले, त्यांनी संतोषाने जे दिले ते अधिक चांगले करून त्यांना अर्पण करावे. अन्न दिले असेल तर त्याचे शुद्ध प्रवाही रक्त करून तेच अर्पण करावे, वस्त्र दिले असेल तर ते स्वच्छ धुऊन वाहून द्यावे. कबीराला केवढी लाज आली होती ; कळवळून या संताने आक्रंदन केले—

" घर जाऊ कैसे छिपाऊँ कैसे ।
जा के बाबुल से नजरे मिलाऊँ कैसे ।
लागा चुनरी में दाग "

शून्य मंडळाची स्वप्ने बघण्याची शक्ती असलेला संत कबीर थोर होता. देवाचा लाडका होता. आणि आम्ही—किडे, मुंगळे ! आमच्या इच्छा, आमच्या आकांक्षा अशाच मातीत जायच्या. दु:ख तेवढेच आणि सुखही तेवढेच. सुख असे की, इच्छा बाळगता आली आणि दु:ख असे की, ती धुळीत मिळाली !

श्रेष्ठ साधक श्री. जमनालालजी यांचा ऐहिक इतिहास तारीखवार लिहिण्याची फार मोठी गरज होती. ती जमनालालजींचे स्नेही आणि मित्र श्री. हरिभाऊ उपाध्याय यांनी पूर्ण केली. त्यांचे ' श्रेयार्थी जमनालालजी ' हे पुस्तक सन १९५१ मध्ये प्रसिद्ध झाले. सांगोपांग, सचित्र असा परिपूर्ण संयोग त्यांनी साधला. त्या चरित्राचा मागोवा घेऊन सन १९५८ मध्ये मराठीत सच्छील चरित्रकार दा. न. शिखरे यांनी ' कृतार्थ जीवन ' हे त्यांचे चरित्र प्रकाशित केले. या दोन्ही चरित्रांनी आगामी पिढीसाठी फार मोठे कार्य केले. जमनालालजींच्या आंतर जीवनाची तडफड, तळमळ यथाशक्य या दोन्ही पुस्तकांत व्यक्त झाली आहे.

या व्यक्ततेपेक्षाही कितीतरी अव्यक्त राहून गेले. माणसाचे चरित्र हिमनगासारखे असते. त्याचा एक नवमांश भागच दिसू शकतो. समुद्राच्या तळातील आठ नवमांश भाग आपल्या कुवतीप्रमाणे ओळखावा लागतो. हा अंदाज चरित्रकार आपल्या शक्तीनुसारच घेऊ शकतो. पुष्कळदा त्यासाठी शब्दही सापडत नाहीत. कारण ते शब्द रूढ अर्थाने इतके झिजले असतात की, त्यांचा यथातथ्य अर्थ लुप्तच होऊन जातो. पुष्कळदा आपण म्हणतो ' अंतरीची तळमळ कोणा ठावे. ' पण ' तळमळ ' या शब्दाचा अर्थ काय ? व्युत्पत्ती कोणती ? सामान्यपणे अर्थ शोधण्याची गरजच आपल्याला पडत नाही पण तळमळ म्हणजे तळातला (अंत:करणातला) मळ वर येतो, असे म्हटले तर अर्थ भगवद्गीतेपर्यंत जाऊन भिडतो. अंत:करणातला मळ वर न येऊ देणे म्हणजेच शांत होणे ! ही शांती कधी मिळते ? दुसऱ्या अध्यायात ' गीताई ' मध्ये—

" न भंग पावे भरताहि नित्य ।
समुद्र घेतो जिरवूनि पाणी ।
जाती तसे ज्यात जिरूनि भोग ।
तो पावला शांति न भोग-लुब्ध ।। "

भोग जिरविणे व भोग न जिरवता येणे, या संघर्षातच तळमळ शब्द उपयोगी पडू शकतो. दुसरा शब्द ' कळणे ', अर्थ आपण वापरतो तो आकलन होणे—माहिती होणे, ज्ञान होणे.

पण 'कळणे' या शब्दाच्या तीन अक्षरांत दोन तृतीयांश 'कळ' असते, असा विचार केला की आतल्या आत बरे वाटू लागते.

जमनालालजींची सर्व जीवनयात्राच अंतर्मुख अशी होती. बालपणापासूनच त्यांचेवर असे काही प्रसंग घेतले की, बाहेर बघण्यापेक्षा आत बघण्याची सवय त्यांना लागली. त्यांचा जन्म कार्तिक शुद्ध १२ ; १९४६ वि. ; ता. ४ नोव्हेंबर १८८९ साली झाला. हे बालक देखणे होते आणि विशेष म्हणजे आजानुबाहू होते. ह्या देखणेपणाच्या खुणा तपतापानंतरही ११ फेब्रुवारी १९४२ पर्यंत जशाच्या तशाच होत्या. एवढेच नव्हे, तर कांती अधिकाधिक वाढतच गेली. पित्याचे नाव कनिरामजी. आईचे नाव बिरदीबाई. हे बालक साडेचार वर्षांचे होते न होते तोच दुसऱ्या एका मातेच्या मांडीवर बसण्याची त्याच्यावर पाळी आली. नकळत्या वयात जे होते त्याची कळ कुठेतरी आत आत जाऊन बसते. जन्मल्यापासून मूल आईचा स्पर्श ओळखते. त्या स्पर्शाला पारखे झाल्याबरोबर त्या बालकाला काय वाटले हे त्याला तर कळत नाहीच पण आपल्यालाही कळत नाही. कल्पना मात्र करता येते. दुर्दैवी बालक दुडदुडत्या वयात आपली आई गमावून बसते आणि त्या क्षणापासून जणू अनंत अनुभव काही क्षणात घेऊन ते प्रौढ होऊन जाते. त्याला कितीही सुखात ठेवले, कितीही ममतेने त्याचे लालनपालन केले, संपत्तीच्या राशी डोळ्यात मावणार नाहीत इतक्या ओतल्या तरी तो अनुभव त्याला विसरताच येत नाही. 'अनुभवाच्या शाळेत शिकलो' असे म्हटले जाते ते या अर्थाने ! शाळेत दहा पुस्तकांनी वा दहा वर्षांनी जो अनुभव येईल तो अशा वेळी दहा क्षणातच येऊन जातो.

चरित्राचा आलेख परिपूर्ण व्हावा म्हणून हरिभाऊजींनी जमनालालजींची जन्म-लग्न कुंडली दिली आहे. हिची फलिते फारसा विश्वास न ठेवता बरेच काही बोलून जातात. सप्तमेश एकादशात, कन्येचा शुक्र भोगाविषयी, ऐहिक सुखाविषयी उदासीनता दर्शवितो. लग्नेश लाभात आहे. हा उत्तम लाभदायी योग ! द्वादशेचा तुळेचा रवी हा सत्कर्माची ओढ, सत्कर्मासाठी औदार्य आणि इतरांसाठी त्याग करण्याची वृत्ती दाखवितो. पंचमेश गुरु, धनस्थानात स्वराशीचा असल्याने संततीच्या बाबतीत नावलौकिकात भर घालणारी संतती सुचवितो. दशमात रवीच्या राशीत शनी. वडिलोपार्जित वारसा काही न मिळणे, वडिलांशी मतभेद असणे याचे सूचक. धनाविषयी कसलाही लोभ नसल्याचे धनस्थानात केतू असल्यामुळे सूचित होते.

भविष्याची ही फलिते विश्वसनीय आहेत की नाहीत, हे तज्ज्ञांचे काम ! पण 'वडिलांशी मतभेद' याचा अर्थ एवढाच लावता येईल की, जमनालालजींना कळू लागल्यापासून दत्तविधान पसंत नव्हते, एवढाच निघतो. धनंतराच्या घरी म्हणजे श्रीमंत सेठ बछराजजींच्या घरी दत्तक गेल्यानंतर जमनालालजींना कदाचित असे तर वाटले नसेल की, आपल्याला मिळालेली संपत्ती आपली नव्हे. आपल्या बाडवडिलांपासून मिळालेली नव्हे ! ती देवा-दैवाने लाभली आहे. हिचा विनियोग आपल्यासाठी करणे योग्य नाही. अशा प्रकारची उदासीनता वयाच्या सतराव्या वर्षी त्यांच्या अंगी बाणली. ती सन १९०६ मध्ये सेठ बछराजजींना त्यांनी जे पत्र लिहिले त्यातून दिसून येते. बारा वर्षे कळणे न कळणे यात वेचून त्यांनी आपल्या धनंतर आजोबांना पत्र लिहिले ते मारवाडी भाषेत असले तरी स्वच्छ, नितळ आहे. त्या पत्रातून जमनालालजींचे लख्ख दर्शन होते. पत्र असे—

"आज मिती ताई तो हमारे बारे में अथवा जो हमारे ताई खर्च हुयो सो हुयो बाकी दिन सूं आम कनेसूं एक छदाम कोडी हमा लेवांगा नहीं अथवा मंगवांगा नहीं। और आप के

मनमां कोई रीत का विचार करजो मत ना। आपकी तरफ हमारो कोई रीत का हक आज दिन सो रह्यो छे नहीं। और आपके मन में हो की सब पीसा का साथी है, पीसा तांई सेवा करे छे, तो हमारे मन मां तो आपका पीसा की बिल्कुल छे नहीं और भी ठाकुरजी करेंगा तो आपके पीसा की हमारे मन में आगे भी आवेगी नहीं। कारण हमारी तगदीर हमारे साथ छे। और पीसा हमारे पास होकर हमां काई करेंगा। म्हाने तो पीसा नजीक रहने की बिलकुल परवाह छे नहीं। आपकी दया से श्री ठाकुरजी का भजन सुमरन जो कुछ होवेगा सो करेंगा। तो इस जनम मांही भी सुख पावेंगा और अगला जनममां ही भी सुख पावेंगा।

सब झूठा नाता छे। कोई कोई को पोता नहीं और कोई कोई-को दादो नहीं। सब आप आप का सुख का साथी छे। हमां आज दिन आपके उपदेश सूं मायाजाल सूं छूट गया छां। आगे श्री भगवान संसार सूं बचावेगा ।। "

मेकॉलेच्या शिक्षणपद्धतीतला सुशिक्षित मनुष्य हा मजकूर लिहूच शकत नाही. सुसंस्कृत मनुष्य मात्र लिहू शकेल. वयाच्या सतराव्या वर्षी नवल म्हणजे जमनालालजींनी ज्यांना गुरुस्थानी मानले त्या आचार्य विनोबांशीही त्यांची गाठ पडली नव्हती. मग ही संस्कृती कोणती ? शाळेतले शिक्षण जमनालालजींना केवळ चार वर्षेच मिळाले. नंतर शाळा नाही की कॉलेज नाही. म्हणून या पत्राचा संबंध वेगळ्या रीतीने जोडावा लागतो. श्रीमद्आद्यशंकराचार्यांच्या 'शिवापराधक्षमापनस्तोत्रम्' मधील या श्लोकाशी तुलना करू या—

"किंवानेन धनेन न वाजिकरिभिः प्राप्तेन राज्येन किम् ।
किं वा पुत्रकलत्रमित्र पशुभिर्देहेन गेहेन किम् ।
ज्ञात्वैतत्क्षणभङ्गुरं सपदि रे त्याज्यं मनो दूरतः ।
स्वात्मार्थं गुरुवाक्यतो भज भज श्रीपार्वतीवल्लभम् ।। "

ज्याला अद्यापिही ज्ञाननिष्ठ माणसे भगवान शंकराचार्य म्हणून संबोधितात त्यांच्या या श्लोकाशी साम्य दाखविणारे जमनालालजींचे पत्र हा योगायोग समजावा की नियतीची लीला समजावी की, या मुलाच्या हातून काही तरी घडवून दाखवावे अशी ईश्वराची इच्छा होती, हे कोण जाणे!

योग बघा, धर्मकीर्तनाने तृप्त होणारे श्रीज्ञानदेव यांनी देह ठेवला तो बावीसाव्या वर्षी. भगवान शंकराचार्यांनी देह ठेवला तो बत्तीसाव्या वर्षी आणि मला आदर्श माणूस व्हायचे आहे ह्या ध्येयाचा ध्यास घेतलेल्या जमनालालजींनी देह ठेवला तो बावन्नाव्या वर्षी !

जमनालालजींचा ओढा राजकारणाकडे नव्हता, धर्मनिष्ठ जीवनाकडे होता, हे तर खरेच. त्यांना आस होती ती धर्माची, धर्म-जीवनाची, आत्मोन्नतीची ! "आत्म्यातचि असे तुष्ट" या वृत्तीच्या साधकाला आत्मतत्त्व कुणाकडून तरी समजून घ्यावे लागते. केवळ तपाने ते मिळतेच, असे नाही. स्वामी विवेकानंदांना ज्ञान झाले ते शक्तिपाताने, असे म्हणतात. पण असा गुरु सापडणार कोण ? 'अध्यात्म' हा शब्द तसा सवंग झालेला आहे. पण देहधारी माणसाने आपल्या देहात आत्मा आहे आणि आत्मा हा ईश्वराचाच अंश आहे, ही भावना सतत बाळगली, तरीही प्रज्ञा जागतेच असे नाही. देहात आत्मा आहे. त्याला सजविता, भिजविता, निजविता येत नाही. पण तो देहात असतो म्हणून त्या देहालाच सजवावे, भिजवावे,

निजवावे असेही अध्यात्माचे मार्ग आहेत. त्या आत्म्यासाठी देह शुद्ध राखणं, ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रियांकडून शुद्ध-सात्त्विक काम करवून घेणे असाही एक मार्ग आहे. आणि त्या मार्गाने जाणे सत्पुरुष पसंत करतात. पण शुद्ध म्हणजे काय, हेही सांगणारा कोणी हवाच. 'सद्-गुरुवाचोनि सापडेना सोय' हेच खरे!

पूर्वसुकृताने म्हणा किंवा दैवयोगाने म्हणा, जमनालालजींना हव्या असलेल्या "शाब्दे परेच निष्णात" असा गुरुही भेटला. त्याची भेट होईपर्यंत जमनालालजींची धर्मसाधना सुरूच होती.

धर्माचे आजोबा सेठ बछराजजी यांनी ठाकुरजींच्या भजनात जमनालालजींना मग्न होऊ दिले नाही. त्यांना शोधून समजावून घरी आणले. पण पैसा बोचू लागला. 'दाने सर्वस्व देणे, वेचणें ते व्यर्थ करणे' अशी तपाकडे त्यांची वृत्ती वळू लागली.

दान घेण्याचा परिप्रकार जमनालालजींच्या बालवयातच घडला. सेठ बछराजजींनी निश्चय, आर्जवे करून जमनालालजींना दत्तक तर घेतले, व्यापाऱ्याचा हिशेब पैशाअडक्यांचाच असणार! दत्तक घेतल्यानंतर सेठ कनिरामजींना ते म्हणाले," काय देऊ? किती देऊ? म्हणाल ते देतो." कनिरामजी क्षणाचाही विचार न करता उत्तरले, "काही नको. मी मुलगा दिला तो कशाच्याही अपेक्षेने नाही. माझ्या धर्मपत्नीचा शब्द पाळायचा म्हणून मी हे केले." तरी देखील बछराजजींचा हट्ट कायमच राहिला. तेव्हा नाईलाजाने कनिरामजींनी मागितले ते अभिनवच! ते म्हणाले, "सेठजी, तुमचा तसा आग्रहच असेल तर एक करा---आमच्या कासिकाबासमध्ये विहीर नाही. लेकीबाळींना आणि सर्वांना दुरून कद्‌साकाबास गावाच्या विहिरीवरून पाणी आणावे लागते. सर्वांसाठी विहीर बांधून दिली तर गावाची गैरसोय दूर होईल." बछराजजींनी हे आनंदाने मान्य केले. ती विहीर अजून वापरली जाते. तिच्यातले पाणी भरपूर तर आहेच आणि गोड, रुचकरही आहे.

दुसरे एक अभिनव दान---ते जमनालालजींनी स्वयंस्फूर्तीने दिले. त्यानंतर त्यांचा दान-महिमा वाढतच गेला. 'सोमाय स्वाहा, सोमाय इदं न मम'---हे माझे नाही, जे आहे ते सोमदेवते, ते तुझे आहे. म्हणून तुलाच ते अर्पण, ही आहुती तुझीच! पण या पहिल्या दानाचा जमनालालजींना जो आनंद झाला, तसा आनंद लक्षावधी रुपये दान करूनही त्यांना झाला नाही, हे स्वतः त्यांनीच नमूद केले आहे.

१९०२ पासून सबंध भारतात एक नाव गाजत होते, गर्जतही होते! ते लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांचे! टिळक म्हणजे करार. टिळक म्हणजे वेग---आवेग, विज्ञा, प्रज्ञा! टिळकांचा 'केसरी' म्हणजे अस्त्राचा, शस्त्राचा भडिमारच! १९०६ ची घटना. पं. माधवराव सप्रे यांनी नागपूरला 'हिंद केसरी' म्हणून हिंदीत टिळकांचा 'केसरी' काढण्याचा संकल्प सोडला, आणि त्या संकल्पासाठी जमनालालजींनी १०० रुपये पाठवून दिले. ही रक्कम छोटी आहे, पण तिचा महिमा मोठा---फार मोठा! कारण हे शंभर रुपये जमनालालजींचे आप कमाईचे होते. बछराजजी त्यांना त्यांच्या स्वतःच्या खर्चासाठी रोज एक रुपया देत. जमना-लालजींच्या गरजाच कमी. खाणे-पिणे, मौज-मजा यात त्यांना रस नसे. तसे पाहिले तर त्यावेळचा एक रुपया पाच माणसांच्या कुटुंबाचा दोन दिवसांचा उदरनिर्वाह करू शकत असे.

जमनालालजींनी एक एक करता रुपये साठवून ठेवले आणि योग्य प्रसंग येताच पाठवून दिले टिळकांचा 'केसरी' हिंदीत निघतो आहे ना, उत्तमच ! कितीतरी लोक वाचतील, एवढीच इच्छा ! या इच्छातृप्तीतून जमनालालजींना किती शिक्षण मिळून गेले याचे प्रत्यंतर लगेच दिसू लागले.

१९०६ ते १९१५ जमनालालजींनी सामाजिक सुधारणा, ज्ञातीसुधारणा, रूढी सुधारणा घडवून आणण्याचा उपक्रम केला. मारवाडी समाजाने जुनाट चालिरीती, निरर्थक अपव्यय लग्नादि समारंभात अमाप खर्च अशा प्रकारच्या बंधनातून मुक्त झाले पाहिजे, या धोरणाने त्यांचे प्रयत्न सुरू झाले. १९०६ पर्यंत लो. टिळकांचा प्रभाव आणि १९१५ मध्ये म. गांधींशी संपर्क ! या नऊ वर्षांमध्ये शुभयोग म्हणजे एका व्यक्तीशी झालेला संपर्क ! ही व्यक्ती सामान्य नव्हती. जमनालालजींसारख्या आर्त जिज्ञासूची गरज भागविण्याची अस्मिता तिच्यात होती. ती व्यक्ती म्हणजे श्री. श्रीकृष्णदासजी जाजू ! स्वयंप्रेरणेने आणि समबुद्धीने एखादी व्यक्ती आपल्याच अंत:प्रेरणेने किती वरवर चढू शकते आणि शांती प्राप्त करू शकते, याचे उदाहरण म्हणजे जाजूजी ! त्यांचा जन्म २१ ऑगस्ट १८८२. म्हणजे जमनालालजींपेक्षा सात वर्षांनी ते मोठे होते. त्यांच्या प्रभावाने जमनालालजी त्यांना वडील बंधूचा मान देऊ लागले. योगायोग बघा ! जमनालालजींना माणसे शोधण्याचा हव्यास आणि योग्यवेळी योग्य माणसे त्यांना लाभत, हे त्यांचे सुकृत !

याच दरम्यान जमनालालजी कलकत्त्याच्या काँग्रेस अधिवेशनाला जाऊन परतले ते अंतर्बाह्य बदलून, काही तरी शुभ, सात्विक मनी घेऊनच ! मैत्री जुळली ती श्रीकृष्णदास जाजूंशी !

जाजूजी पहिल्या वर्गात प्रथम क्रमांकाने कलकत्त्याची वकिलीची परीक्षा पास झाले आणि जिल्ह्याचे गाव म्हणून वर्ध्याला येऊन वकिली करू लागले. वकिली हा धंदाच. पण त्यातही सचोटी ही त्यांची स्वत:ची ! ते सत्याला स्मरूनच खटले घेत. असत्याला दारात उभे करीत नसत. त्यांची सचोटी न्यायाधीशांनाही परिचित झाली. जाजूजींची वकिली उत्तम चालू लागली. अगदी खोऱ्याने म्हणतात तसा पैसा ओढण्याची वेळ आली आणि नेमकी याचवेळी जाजूजींची वृत्ती पालटली. ते समजून चुकले की, कितीही सत्य जोपासले तरी या धंद्यात कोठे ना कोठे तडजोडीची वेळ येतेच ! नकोच ते ! घरच्या मंडळींच्या कानावर त्यांनी घातले की, २० हजार रुपये माझ्याजवळ जमा होईपर्यंतच मी वकिली करीन. नंतर मात्र लोकसेवेतच माझे तन [illegible] मी वाहून देईन. तसे त्यांनी केलेही. त्यावेळचे २० हजार आणि आताचे २० हजार, यांना 'पटी' ने हिशेबच करता येत नाही. त्यावेळच्या २० हजारांना जीवनात आपला मार्ग निवडून घेण्याइतकी ताकद होती !

अशा या दृढनिश्चयी माणसाला जमनालालजींनी थोरला बंधू ठरवून टाकले, आणि सामाजिक सुधारणेकडे आपला मोहरा वळविला. जाजूजींना राजकारणात रस नव्हता. समाजकारण आणि सेवा इकडे कल त्यांचा जास्त होता. पण जमनालालजींनी धाकलेपणाचा अधिकार गाजवून त्यांनाही गांधीजींकडे ओढले आणि चरखा संघाची सर्व जबाबदारी त्यांचेवर सोपविली. योग्य कामाला योग्य माणूस !

जमनालालजींच्या सेठ बछराजजींना लिहिलेल्या पत्राच्या काही अवधीनंतरच १९०७ मध्ये सेठ बछराजजींचे देहावसान झाले. आणि व्यापार-व्यवहाराचा पसारा जमनालालजींवर पडला. तो त्यांनी वयाच्या १८ व्या वर्षीच—

'जोडोनिया धन उत्तम वेव्हारे । उदास विचारे वेच करी'

अशा संकल्पाने उत्तम रीतीने सांभाळला. जमनालालजी धन जोडायला आणि उदास विचार करायला मोकळे झाले. आजोबा आणि आजीची इच्छा पूर्ण करण्यासाठी प्राप्त धनाचा उपयोग खरोखरच धर्मकार्यापासूनच सुरू करून वर्धेला त्यांनी १९०७ साली सुबक, सुंदर असे 'लक्ष्मी-नारायणा' चे मंदिर बांधले. तेथे भजन, पूजन, पूजा-अर्चेची व्यवस्था केली आणि नित्यनेमाने ते दर्शन घ्यायला जाऊ लागले. दिवसभर व्यवहार आणि संध्याकाळी देवाजवळ त्या व्यवहाराचे निवेदन ! म्हणजे सर्व ईश्वरसाक्षच ! हीसुद्धा एक तपस्याच ! जमनालालजींचे आगमन वर्धेला जे झाले ते देहलीदीपक न्यायासारखे ! जी काही त्याग-वैराग्याची कामे येथे चालू होती, तिकडे लक्ष द्यायचे आणि पुढिलांचे हित उन्नतीला आणायचे !

त्यानंतर त्यांचे लक्ष नव्या पिढीकडे गेले. ही नवी पिढी देवकार्याचे-देशकार्याचे संकल्प घेऊन पुढे यावी या उद्देशाने त्यांनी वडील बंधूंशी मसलत करून छात्रावासाची व्यवस्था केली. वर्धेला मायदेशी, मुंबई, कलकत्ता इथवर छात्रावासांचा पसारा सुरू झाला. नव्या निष्पाप बालकांना वळण लागावे, ही त्यांची इच्छा ! स्वतः अधिक शिक्षण घेता आले नाही. १८९६ ते १९०० ही चार वर्षेच शाळेतील शिक्षण त्यांना मिळाले. परंतु हिंदी, मराठी, मारवाडी आणि कामापुरते इंग्रजी त्यांनी आत्मसात केले. आतासारखी त्यावेळी दुसऱ्याकडून भाषणे लिहून घेण्याची पद्धत नव्हती आणि त्यावेळच्या मंडळींना गरजही नव्हती. कारण त्यांचेजवळ त्यांचे विचार होते. अन् ते पुस्तकी नव्हते. 'अमुक अमुक काय म्हणतो' असा निबाळा देत मुलांना शिकविणारे शिक्षक त्यावेळी नसावेत असे वाटते. पण आत्मसंशोधन, आत्मनिरीक्षण, तज्जन्य अनुभव गर्दी करू लागले की, शब्द आपोआप सुचतात. या संशोधनातून शब्दांना मंत्राचे रूप येऊन जाते. जमनालालजी वर्किंग कमिटीचे सभासद असताना कार्यवाहीचा मसुदा अचूक शब्दयोजनेसाठी सहकाऱ्यांना जमनालालजींची गरज पडायची. याची साक्ष वल्लभभाई पटेल यांनीच देऊन ठेवली आहे. सत्यासत्य विवेकातून जे शब्द सुचतात तेच शब्द परिणाम करून जातात आणि 'अक्षर' होऊन बसतात. काँग्रेस कार्यकारिणीचे जास्तीत जास्त वर्षे सदस्य असलेले एकमेव सदस्य म्हणजे जमनालालजी !

जमनालालजींच्या व्यापारकौशल्याकडे जनतेपेक्षाही त्यावेळच्या ब्रिटिश सरकारचे लक्ष अधिक होते. असा धनंतर माणूस आपला व्हावा म्हणून त्यावेळच्या रीतीप्रमाणे सरकारने त्यांना १९०८ साली ऑनररी मॅजिस्ट्रेट केले आणि पुढे 'रायबहादूर' ही केले. पण ही ब्रिटिश सरकारची साहेबी, बहादुरी प्रसंग येताच त्यांनी इतक्या लीलेने सोडली की, सरकारचे बोट जे एकदा तोंडात गेले ते तिथेच राहिले. जमनालालजींची दृष्टी छात्रावासाहून शिक्षणाकडे वळली. मुले शिकायला हवीत, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण ही त्रिसूत्री लोकमान्य टिळकांनी पेरूनच ठेवली होती. त्याच हेतूने सन १९१० मध्ये वर्धेला मारवाडी विद्यालय स्थापन केले आणि जागोजागी राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार झाला. जमनालालजींनी आपला वाटा यासाठी तर दिलाच पण दुसऱ्यांकडूनही घेऊन त्या उपक्रमाला चालना दिली. व्यापारी

दान देतो घेत नाही, ही त्यावेळची प्रथा ! पण जमनालालजी दान घेतही असत आणि चांगल्या कामासाठी हातही पसरत असत.

तथापि, या देवाच्या आणि देशाच्या कार्याने त्यांचे समाधान होईना. आचार्य––अनुशासनामध्ये शिक्षण पूर्ण झाल्यावर गुरु दीक्षा देत असे. त्यात 'सत्यं वद, धर्मं चर' पासून तर 'संविदा देयम्' पर्यंतचे आचरण त्यांच्याकडून होऊ लागलेच होते. पण 'अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा' येथून मार्गदर्शकाची गरज वाटू लागली. ही गरज त्यांच्याच शब्दात देणे उचित होईल. व्यापार-उदिमाच्या व्यवहारातही बही-खात्यावरील त्यांची प्रार्थना खरोखरच मंत्रासारखी आहे. "श्री लक्ष्मीजी सुं प्रार्थना है कि सद्बुद्धि देवे तथा सत्य के साथ वेपार करन की तथा रुजगार मां ही लाभ होवो जी को देश तथा दुःखी जनता के कार्य मांही की बुद्धि देवे." हे शब्द त्यावेळच्या काय किंवा आजच्या काय प्राथमिक, मध्यम व उच्च शिक्षणातही शिकविले जात नाहीत.

जाजूजींसारखा ज्ञानी, अनुभवी बंधू लाभूनही त्यांना मार्गदर्शकाची गरज वाटू लागली आणि त्या शोधात जमनालालजी निघाले. त्यावेळची त्यांची मनाची तळमळ त्यांनीच व्यक्त केली आहे. "जीवन सेवामय, उन्नत, प्रगतिशील, उपयुक्त आणि सरल व्हावे ही भावना मला कळू लागल्यापासूनच अस्पष्टरूपे माझ्या मनात होती. इसी के पूर्ती के हेतु सामाजिक, व्यापारिक, सरकारी और राजकीय क्षेत्रों में कुछ हस्तक्षेप करना प्रारंभ किया ! सफलता मेरे साथ थी ! परंतु माझ्या मनात एक विचार दृढ होत गेला की, सफल-संपूर्ण जीवनासाठी कोणी तरी योग्य मार्गदर्शक आवश्यक आहे. मैंने अपने विविध कार्यों में लगे रहने पर भी इस खोज को चालू रखा. इसी मार्गदर्शन की खोज में मुझे गांधीजी मिले और सदैव के लिये मिले।"

"सफल-संपूर्ण जीवनासाठी मार्गदर्शकाचा शोध लागावा म्हणून मी भारतातील अनेक व्यक्तींशी संपर्क साधला. महामना मालवीयजी, कविवर रवीन्द्रनाथ ठाकूर, सर जे. सी. बोस, लो. टिळक, श्री. खापर्डे, श्री. केळकर इत्यादी पुढाऱ्यांशी व्यक्तिगत कमी-अधिक परिचय मी करून घेतला. त्यांच्या संपर्कात मी राहिलो. त्यांच्या जीवनवर्तनाचे निरीक्षण केले. मेरी इस खोज में एक बात ने मेरे दिल पर सबसे बडा असर रखा था और वह थी तुकाराम महाराज की उक्ती––"बोले तैसा चाले त्याची वंदावी पाउले"। अनेक नेताओं से मेरा परिचय होने पर मुझे उनके जीवन में मेरे इस सिद्धांत की प्राप्ती जिस परिमाण में होनी चाहिए––नहीं हुई। भिन्न भिन्न व्यक्तिओं के भिन्न भिन्न गुणों का मुझपर असर पडा। सबके प्रति मेरी श्रद्धा और आदर भी बना रहा। पर अपने जीवन के मार्गदर्शक के स्थान पर किसी को आसीन नहीं कर सका।"

जमनालालजी आपले विचार किती सरळ भाषेत व्यक्त करीत असत, याचे हे उत्तम उदाहरण ! विचाराची बैठक असल्याशिवाय इतकी सोपी भाषा येऊच शकत नाही. म. गांधींची लेखनशैली आणि पू. विनोबांची मंत्रमय सोपी सोपी शब्दरचना ज्यांना परिचित आहे त्यांना यातील मर्म सहज कळावे.

तात्पर्य, वंदन करण्यासाठी त्यांना 'बोले तैसा चाले' असा मार्गदर्शक आणि "शब्दे परेच निष्णात" असा गुरू हवा होता. त्यावाचून आत्मानुशासनाचे कोडे सुटणार नव्हते आणि ग्रहयोग असे की, शोधले म्हणजे सापडते या न्यायाने अशा विभूती त्यांना भेटल्याही ! ही पूर्व सुकृताची जोडीच !

१९१५ मध्ये म. गांधी भारतात आले. आपले गुरु ना. गोपाळ कृष्ण गोखले यांच्या आदेशावरून गांधीजींनी भारतभर प्रवास सुरू केला. आणि जमनालालजींना त्यांच्या रूपाने असा मार्गदर्शक लाभला की ज्यांच्याशी आप्तसख्य जोडून ते निश्चिंत झाले.

ही जोडणी विलक्षणच आहे. कोणाच्या आयुष्यात घडणार नाही अशी––घडेल ती एखाद्याच्याच ! त्यात जमनालालजी होते, गांधीजींच्या शब्दात ती देणे योग्य होईल. पण ते सोपे नाही. गांधीजी इंग्रजीत लिहीत तेव्हा त्यांच्या दृष्टीसमोर बायबल असायचे. हिंदी-गुजरातीत लिहीत तेव्हा गीता किंवा उपनिषदे त्यांच्या दृष्टीपुढे असायची. त्यांच्या धर्मपूत शब्दांचे भाषांतर करायचे तरी कसे ? जमनालालजींच्या देहावसानानंतर २२ फेब्रुवारी १९४२ च्या 'हरिजन' मध्ये त्यांनी लिहिले "ट्वेंटी टू इयर्स अॅगो ए यंग मॅन विथ ब्लूम ऑफ थर्टी स्प्रिंग्ज अपॉन हिम, केम टु मी अँड सेड–– बापू, मला तुमच्याजवळ काही मागायचं आहे".

'जरूर माग, ते तुला मिळेलही. पण ही मागणी माझ्या आवाक्यात मात्र असायला हवी.'

'मला देविदाससारखाच तुमचा पाचवा पुत्र समजा.'

'अॅग्रीड'. आय रिप्लाईड. 'ओनली आय ॲम गिव्हिंग नथिंग. यु आर द गिव्हर.'

१९४२ पासून बावीस वसंत ऋतू वजा केले तर ही पुत्रभावना १९२० मध्येच निश्चित झाली आणि जमनालालजींच्या उत्साहाला, आनंदाला जणू उधाण आले.

दोनच गोष्टींची त्यांना आस लागली. एक तर 'स्थावराणां हिमालय' आपल्याकडे यावा. ते जर शक्य नसेल तर आपणच त्याच्या सावलीत जावे. प्रयत्न सुरू झाले. गांधीजी गुजरातमधील कोचरब (साबरमती आश्रम) येथे आल्याबरोबर जमनालालजींनी त्यांना विनंती केली की, आपण मजजवळ यावे. मी माझे सर्वस्व तुम्हांला अर्पण करीन. गांधीजी म्हणाले, मी गुजरातचा. गुजरातची सेवा करूनच मी भारताची सेवा करीन. या त्यांच्या निश्चयाचा प्रतिवाद करणे शक्यच नव्हते. योग्य वेळ यायची होती आणि कसोटीचा क्षणही यायचा होता, हेच खरे !

पंधरा वर्षांनंतर हा पर्वतच वर्ध्याला आला. जमनालालजींना आशा-साफल्य तर लाभलेच आणि क्षणाक्षणाचा हिशेब ठेवता ठेवता विलक्षण मनःशांती त्यांना लाभली. माणूस जे करतो ते सर्व ईश्वरार्पण केले की, कर्माचे सार्थक होते आणि श्रीज्ञानदेवांच्या शब्दात मन 'निचाड' होऊन जाते. यालाच श्री शंकराचार्य 'चित्तशुद्धी' म्हणतात. शिक्षण, समाजकार्यात जमनालालजींचे दिवस लोटत होते हे खरे तथापि, गुरुचा शोध चालूच होता. धन, संपत्ती, यौवन यांचा प्रसभ तोलता-सांभाळता जमनालालजींचे आत्मनिरीक्षण चालूच होते. या निरीक्षणाचा रोजचा हिशेब ते आपल्या रोजनिशीत टिपून ठेवीत.

म. गांधींनी वर्ध्याला येण्याची जमनालालजींची विनंती अमान्य केली खरी पण त्यांची मार्गदर्शनासाठीची आस, तळमळ त्यांच्या मनात तशीच राहून गेली. सत्याग्रहाच्या स्थापनेचे निमित्त करून ९ एप्रिल १९२१ रोजी स्वतःच्या क्षती-विक्षतीला बाजूला सारून त्यांनी पू. विनोबाजींना वर्ध्याला पाठवून दिले. विनोबाजी म्हणजे धर्मनिरूपण, धर्माचरणाचे सगुण रूपच ! 'चराति चरतो भगः' हा मंत्र दुसऱ्याला सांगण्याअगोदर त्यांनीच आचरणात आणला. विद्यार्जनाच्या हेतूने त्यांनी घर सोडले. खरोखरची विद्या त्यांना हवी होती. त्यासाठी ते

काशीला गेले. शिकण्याजोगे जे जे असेल ते ते आत्मसात करून मिळालेले ज्ञान अंगाअंगातून फुटून निघते की काय या ध्यासाने हिमालयात गेले आणि तेथून गांधीजींची ओढ घेऊन साबरमतीला स्थिर झाले. त्यांनाही जणू 'पुरुष' गवसला. या पुरुषाच्या आज्ञेने ते जमनालालजींच्या जवळ आले.

म्हणजे वयाच्या अवघ्या बत्तीसाव्या वर्षी पिता आणि गुरु दोहोंचा लाभ झाला. महद्भाग्यच ! कर्मात योग आला आणि येथून जमनालालजींचे पुढचे सर्व कर्मच 'कुशल' होऊन गेले.

म. गांधी भारतात आले आणि एक वेगळेच उत्थान-कार्य सुरू झाले. रायबहादुरी सांभाळीतच उत्तम व्यवहाराच्या मार्गे जमनालालजींचे परोपकाराचे कार्य चालूच होते. व्यंकटेश स्तोत्रात देवदासाने त्याच्या व्यंकटेशाजवळ सर्वांसाठी सर्व मागितले. "देवा, सर्वांना धन दे. पुत्र दे. लग्नार्थी असतील त्यांचे लग्न होऊ दे. व्याधिष्ठांची पीडा हरण कर. त्यांना रोगापासून मुक्त कर. 'युद्धी' शस्त्रे न लागावी आणि सर्वांची कीर्ती साधु-साधु होऊ दे. सर्वांना मोक्ष दे !" ही समष्टीची दृष्टी झाली. पण स्वतःसाठी देविदासाने काय मागितले ? --की देवा

'मजलागी देई ऐसा वर । जेणे घडेल परोपकार'

......ही बुद्धी निर्मळ असते, दुर्मिळही असते, पूर्वसुकृतानेच लाभते. म्हणूनच जमनालालजींनी 'सफलता तो मेरे साथ थी' असे लिहून ठेवले.

गांधीजींना वर्ध्याला तर आणता आले नाही पण अधिक जवळ मात्र आणता आले आणि तशातच १९२० मध्ये अ. भा. काँग्रेसचे अधिवेशन नागपूरला झाले. त्या काँग्रेसचे स्वागताध्यक्ष जमनालालजी. एकमताने निवड. भारताच्या इतिहासाला अद्‌भुत, क्रांतिकारी वळण लावणारे हे अधिवेशन ! असहकारितेचा आविष्कार, पुरस्कार आणि प्रत्यक्ष कृतीचा आदेश देणारे हे अधिवेशन ! या अधिवेशनाचा इतिहास हा काँग्रेसचा इतिहास आहे. जमनालालजींच्या जडणघडणीत आणि शोध-संशोधनात त्यांच्या पदरी काय पडले, एवढ्याशीच कर्तव्य !

जमनालालजींना जणू हजार हत्तींचे बळ आले. हा हत्तीचा दृष्टांत बरोबर नाही. कारण हत्ती आपल्या बळाचा काय उपयोग करतो याची नीटशी माहिती उपलब्ध नाही. श्री ज्ञानेश्वरांनी 'आंग मनापुढे घे दौडा' असे या स्थितीचे वर्णन केले आहे. काय करू, किती करू, एवढाच विचार त्यांना करायचा होता. कसे करायचे हे सांगायला विनोबाजी होतेच. पिता गांधीजी, गुरु विनोबा--दोन महापुरुषांच्या उपलब्धीने जमनालालजींनी सदिच्छांचा, सेवेचा, देशपरतेचा पसारा असा काही पद्धतशीर पसरला की त्याची कोणाला कल्पनाही आली नसेल. संत तुकारामांचे 'बोले तैसा चाले' हे वचन त्यांना रोजच उपयोगी पडायचे. पसाऱ्याची बांधणी आणि रचना करताना एखाद्या माणसाला हनुमंताचीसुद्धा आठवण येऊ शकेल. समर्थांनी--

'हे धरा पंधरा श्लोकी । लाभली शोभली भली'

असा निर्वाळा देऊन 'दर्शने दोष नासती' येथे आपला हनुमंताचा नमस्कार संपविला. नमस्कार केला तो कोणाला ? रामरूपी अंतरात्म्याला--म्हणजे हनुमंत रामाचा अंतरात्माच ! रामाच्या केवळ दृष्टिपातातूनच रामाच्या इच्छाआकांक्षा हनुमंताला कळायच्या आणि "आंग मनापुढे घेत दौडा" पेक्षाही त्याची गती वाढायची. केवळ रामाच्या नावाने कोटीच्या

कोटी उड्डाणे घेण्याची शक्ती त्याला मिळायची. या गतीसाठी समर्थांचे शब्द अद्‌भुतच आहेत.

" आरक्त देखिले डोळा । ग्रासिले सूर्यमंडळा "

हनुमंताला काहीतरी 'आरक्त' दिसले आणि पाते लवते न लवते त्या अगोदरच 'ग्रासिले सूर्यमंडळा.' : गतीच्या दोन्ही कल्पना अद्‌भुत तर आहेतच पण दिव्यही आहेत.

जमनालालजींच्या कार्याचा वेग असाच वाढला. मुखी बापूंचे नाव, मनी विनोबांचे नाव ! भावभावना दोघांचीही ! १९२० नंतरच्या बत्तीस वर्षांत त्यांच्या आत्मप्रगतीचा आलेख काढावयाचा तर ते सर्व अनावरच होऊन जाईल. शब्दांची गती संथ होईल. कदाचित थांबेलही. त्यांच्या गतीची कल्पना त्यांच्या आयुष्याच्या आलेखावरूनच या अल्प स्मरणमालेत येऊ शकेल. गांधीजींच्या सर्वच कल्पना त्यांनी प्रत्यक्षात उभ्या केल्या. त्या सर्व संस्थांचा परामर्श वेगळाच घेणे बरे. तूर्त आलेख---

आलेख

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | नोव्हेंबर | १८८९ | .. | जन्म : कासीकाबासमध्ये. |
| | जून | १८९४ | .. | दत्तक : वर्धा येथे वास्तव्य. |
| १ | फेब्रुवारी | १८९६ | .. | शालेय शिक्षणास सुरुवात. |
| ३१ | मार्च | १९०० | .. | शाळा सोडली. |
| | मे | १९०२ | .. | जानकीदेवींशी विवाह. |
| | | १९०६ | .. | 'हिंदी केसरी' ला १०० रुपये दान. |
| | | १९०७ | .. | बछराजजींना 'त्यागपत्र' दिले. |
| | जानेवारी | १९०७ | .. | श्री लक्ष्मीनारायण मंदिराची प्राणप्रतिष्ठा. |
| ३ | जून | १९०७ | .. | बछराजजींचे देहावसान. |
| | डिसेंबर | १९०८ | .. | ऑनररी मॅजिस्ट्रेट झाले. |
| | इ. स. | १९१० | .. | वर्धा येथे मारवाडी विद्यार्थी गृहाची स्थापना. 'मारवाड' ची यात्रा व अनेक शिक्षण संस्थांचे निरीक्षण. |
| | इ. स. | १९१२ | .. | वर्धा येथे मारवाडी हायस्कूलची स्थापना. |
| २७ | ऑगस्ट | १९१२ | .. | कमलाबाईचा जन्म. |
| ५ | जुलै | १९१३ | .. | हिरालाल रामगोपालपासून विभक्त झाले. |
| | | १९१५ | .. | कमलनयन यांचा जन्म. |
| १९ | मे | १९१५ | .. | मुंबई येथे पेढी स्थापन. |
| | | १९१५ | .. | मारवाडी विद्यालय व मारवाडी शिक्षण मंडळाची स्थापना. महात्मा गांधींशी परिचय व जवळीक. |

| | | |
|---|---|---|
| इ. स. १९१७ | .. | राजकारणात प्रवेश. कलकत्ता काँग्रेसचे वेळी महात्मा गांधींची अतिथि म्हणून सेवा. रायबहादूर पदवी. |
| इ. स. १९१९ | .. | मारवाडी-अग्रवाल महासभा अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष (वर्धा). उमाचा जन्म. |
| इ. स. १९१९ | .. | मारवाडी-अग्रवाल जातीय कोषाची स्थापना. |
| १९२० | .. | महात्मा गांधींचे 'पाचवे पुत्र'; नागपूर काँग्रेसचे स्वागताध्यक्ष. तिथेच कोषाध्यक्ष म्हणून निवड. |
| १९२१ | .. | असहकार आंदोलनात भाग. नंतर त्यात उडी घेतली. एक लाख रुपयांचे दान. |
| ९ एप्रिल १९२१ | .. | वर्धा येथे सत्याग्रहाश्रमाची स्थापना; विनोबांचे वर्ध्याला आगमन. 'रायबहादुरी' परत केली. |
| ऑगस्ट १९२१ | .. | 'हिंदी नवजीवन'चा जन्म. |
| १७ ऑगस्ट १९२२ | .. | साबरमती तुरुंगातून महात्मा गांधींचे ते प्रसिद्ध पत्र. त्यात त्यांनी जमनालालजींना 'चिरंजीव' संबोधिले. |
| इ. स. १९२२ | .. | खादी विभागाचे संचालकपद. |
| १३ एप्रिल १९२३ | .. | नागपूर झेंडा सत्याग्रहाचे नेतृत्व. |
| इ. स. १९२३ | .. | रामकृष्णचा जन्म. |
| १० जून १९२३ | .. | झेंडा सत्याग्रहाप्रसंगी अटक. |
| १० जुलै १९२३ | .. | दीड वर्ष तुरुंगवासाची शिक्षा, तीन हजार रुपये दंड. |
| १८ जुलै १९२३ | .. | मोटरगाडी व अन्य वस्तू जप्त. पण त्याची खरेदी कोणीच केली नाही; कोकोनाडा काँग्रेस; खादी बोर्डाचे अध्यक्ष. |
| १९२४ | .. | नागपूर काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष. |
| २३ जुलै १९२५ | .. | देशबंधू स्मारकासाठी आवाहन; खादी प्रचारासाठी राजस्थानचा दौरा. |
| ऑक्टोबर १९२५ | .. | अ. भा. चरखा संघाची निर्मिती आणि कोषाध्यक्ष. सस्ता साहित्य मंडळाची स्थापना. पंचायतीकडून जाती बहिष्कृत. |
| जानेवारी १९२६ | .. | साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमात महात्मा गांधींच्या उपस्थितीत कमलाबाईचा विवाह. |
| २६ मे १९२७ | .. | अ. भा. चरखा संघाचे स्थानापन्न अध्यक्ष. माहेश्वरी सभेत (पंढरपूर) भाग; बिजोलिया (मेवाड) ची पहिली-वहिली यात्रा, भरतपूर येथील हिंदी साहित्य संमेलनास उपस्थित. |

| | | | |
|---|---|---|---|
| | १९२८ | .. | हटुंडी (अजमेर) येथे गांधी आश्रमाची स्थापना, कलकत्ता येथील देशी प्रजा परिषदेत भाग, राजपुतान्याचा दौरा, बारडोली सत्याग्रहाचे वेळी दौरा, भारतभर खादी प्रचार-दौरा, लक्ष्मीनारायण मंदिरात हरिजनांना प्रवेश, रेवाडी येथील भगवद्भक्ती आश्रमात हरिजनांबरोबर भोजन. |
| | १९२९ | .. | हिंदी प्रचार आणि खादी प्रचारासाठी मद्रास दौरा, बहिष्कार चळवळीत सक्रिय सहभाग, अजमेरच्या काँग्रेस दलात दिलजमाई घडवून आणली. |
| २० जून | १९२९ | .. | 'भारत में अंगरेजी राज्य' हे पुस्तक जप्त करण्यात आले त्याला विरोध, पुस्तकांच्या प्रतींचा शोध घेण्यात आला. |
| | १९३० | .. | मिठाचा सत्याग्रह : विलेपार्ले येथे छावणीची स्थापना, वर्धा येथे महिलाश्रमाची स्थापना, जानकीदेवी व कमलनयन यांनी सत्याग्रह केला. |
| १० एप्रिल | १९३० | .. | सत्याग्रहात भाग : दोन वर्षे शिक्षा. |
| | १९३१ | .. | कर्नाटक प्रांतिक काँग्रेस परिषदेचे अध्यक्ष. |
| सप्टेंबर | १९३१ | .. | बंगालमधील संस्थांसाठी धनसंग्रह. |
| | १९३३ | .. | महात्मा गांधी वर्धा येथे मुक्कामी आले. सत्याग्रह : तुरुंगवास. गांधी सेवा संघाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा. |
| | १९३४ | .. | काही काळासाठी काँग्रेसचे कार्याध्यक्ष : बिहार भूकंप-पीडितांसाठी सहाय्यक समिती. |
| | १९३६ | .. | जयपूर राज्य प्रजामंडळाची पुनर्निर्मिती. |
| २७ मार्च | १९३७ | .. | मद्रास येथील हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. |
| ३० जून | १९३७ | .. | कमलनयन यांचा सावित्रीदेवींशी विवाह. |
| ११ जुलै | १९३७ | .. | श्रीमन्नारायण अग्रवाल यांचेशी मदालसा विवाहबद्ध. |
| एप्रिल | १९३८ | .. | जयपूर राज्य प्रजामंडळाचे अध्यक्ष. |
| १३ ऑगस्ट | १९३८ | .. | रमण महर्षी यांचे दर्शन. |
| १५ ऑगस्ट | १९३८ | .. | श्री. अरविंद यांचे पाँडेचरी येथे दर्शन; नागपूर प्रांतिक काँग्रेसचे अध्यक्ष. |
| २९ ऑक्टोबर | १९३८ | .. | जयपूर राज्य प्रवेश बंदीचा निषेध. |
| १ फेब्रुवारी | १९३९ | .. | जयपूर सरकारची अवज्ञा; सत्याग्रह व अटक. |
| १९ मार्च | १९३९ | .. | जयपूर येथे तिसऱ्यांदा सत्याग्रह : नजरकैद. |
| | १९४१ | .. | युद्धविरोधी प्रचारप्रसंगी कैद (नागपूर). |
| ८ मे | १९४१ | .. | तुरुंगात उर्दू वाचायला सुरुवात. |
| ३ जून | १९४१ | .. | नागपूर तुरुंगातून सुटका. |
| १ फेब्रुवारी | १९४२ | .. | वर्धा येथे गो सेवा संमेलन, गो सेवा संघाची स्थापना. |
| ११ फेब्रुवारी | १९४२ | .. | देहावसान : गोपुरी येथे अग्निसंस्कार. |

या आलेखातील काही गोष्टींचा आवर्जून उल्लेख करायला हवा. पू. विनोबा वर्ध्याला आल्यानंतर जमनालालजींचे आत्मनिरीक्षण तर वाढलेच पण उत्साह जणू दुप्पट झाला. पू. विनोबांच्या मुखातून पहिल्या प्रथम जमनालालजींच्या निमित्ताने ईशावास्योपनिषदच निघाले असेल. जीवनाची कल्पना, क्रम, उपक्रम सर्वच त्यात आहे. पहिलाच मंत्र " ह्या जगात जे काही जीवन आहे ते सर्व ईश्वराने वसविले आहे. म्हणून ईश्वराच्या नावाने त्यागून तू (यथाप्राप्त) भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस. " त्यागाने भोग साधणे कसे असते तेच खरे तत्त्व. पू. विनोबांची शिक्षणाची पद्धत पाणबुड्यासारखी आहे. ते स्वतःच सागराच्या बुडाशी जातात आणि तेथून तत्त्व-रत्ने आणतात.

' ईशावास्या ' त दुसराच मंत्र " कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतँ समाः । एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ।। "—सतत कर्म करायची जातूची स्थितीगती एक क्षणभरही कर्माविाचून असूच शकत नाही. आणि असे कर्म करीत करीत शंभर वर्षे जगायचे. त्याहून कमी जगायला मिळाले तर क्षणाचा हिशेबही अधिक सूक्ष्म होऊन जातो.

—आणि जमनालालजींनीही खरोखरच उसंतच घेतली नाही. पू. विनोबांना गुरु मानले, म. गांधींसारख्या ' आश्चर्यवत् ' पित्याच्या मांडीवर जाऊन बसले. आता मला या दोघांच्याही योग्य व्हायला हवे आणि तसा आत्माविष्कार करणेच अगत्य ! पू. विनोबा वर्ध्याला आले ते सत्याग्रहाचे तत्त्वज्ञान घेऊनच. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षणाचे ते दिवस. विदेशी कापड-बहिष्काराचे एक चित्र रेखाटणे येथे आवश्यक वाटते. विदेशी कापडाची एक प्रचंड होळी या सुमारास वर्ध्याला (१९२१) झाली. तिथूनच खादीचे व्रत सुरू झाले. घरचे, दारचे एवढेच नव्हे तर लक्ष्मीनारायण मंदिराच्या देवांचीही कापडे एकत्र केली गेली. आणि या प्रचंड राशीला पहिली काडी कोणी लावली ?—कोणा पुढाऱ्याने नव्हे, कोणा सत्पुरुषाने नव्हे तर जमनालालजींचा मुलगा अवघा सहा वर्षे वयाचा कमलनयन—त्याने ! एवढे लहान वय. होळी पेटविताना पोर भिऊन जाईल, असा कोणी विरोधही केला नाही. उलट, असा अद्भुत जाळ पाहील ते डोळे भरून; त्याने उमज पडेल. तेवढी उमज पाच वर्षे शिक्षण घेऊनही येऊ शकणार नाही. शिक्षणाचा हा प्रयोगच होता जमनालालजींचा ! इतक्या धाकुल्या वयात कमलनयनने साक्षात अग्निदेवतेकडून जणू जीवनाचा मंत्रच शिकून घेतला. मुलांना जीवनाला सामोरे जाऊ देऊ नये, अशीही एक बालशिक्षणाची पद्धती आहे. खेळांतून शिकलेली मुले जीवनाचा खेळखंडोबा करून घेऊ शकतात. लुटुपुटूच्या वस्तूंद्वारे शिकणारी मुलेच जीवनाच्या अंतापर्यंत भातुकलीच खरी मानू लागतात. हेच तर महात्मा गांधींना, पू. विनोबांना सलत होते. मूलभूत शिक्षणपद्धतीचा पुढे विचार झाला त्याला निमित्त कमलनयनमुळेच मिळाले, असे म्हणता येईल.

१९२० चे अखिल भारतीय कॉंग्रेसचे स्वागताध्यक्षपद जमनालालजींनी स्वीकारले. अधिवेशन नवा विचार घेऊन यशस्वी झाले आणि एका विलक्षण आत्मप्रेरणेने देव, पिता आणि गुरु यांच्या साक्षीने १९२३ साली जमनालालजींनी ' झेंडा सत्याग्रहा ' चे अग्रणित्व स्वीकारले. मागचा विचार त्यांनी अगोदरच करून ठेवला होता आणि पुढच्या विचारांची दिशाही त्यांची पक्की झाली होती. झेंडा सत्याग्रहाचे पाऊल त्यांनी स्वयंस्फूर्तीने उचलले. सत्याग्रहाची धडक अशी विलक्षण आणि शिस्त अशी डोळ्यात भरणारी होती की,

जमनालालजींना अटक करूनही 'झेंडा ऊंचा रहे हमारा' हीच स्थिती झाली. जमनालालजींच्या नंतर सरदार वल्लभभाई आले; पंडित जवाहरलाल नेहरु येणार होते. पण सरकारनेच माघार घेतली. हा सत्याग्रह १०९ दिवस चालला आणि १८६१ राजबंदींना अटक झाली.

यानंतरच्या स्वातंत्र्याच्या चळवळी महात्मा गांधींच्या प्रेरणेने, सर्वाधिकाराच्या आधिपत्याने सुरू झाल्या. १९३० सालचा कायदेभंग, १९३३ सालच्या दडपशाहीला उत्तर, १९४० सालचा तात्त्विक वैयक्तिक सत्याग्रह आणि १९४२ चा न भूतो न भविष्यति असा आगडोंब आणि जनतेचे अंतिम आंदोलन ! या सर्वांची जबाबदारी एकटचा महात्मा गांधींनी स्वीकारली होती. एकटचा जमनालालजींचेच नव्हे तर सर्व भारतीयांचे ते राष्ट्रपिता झाले. पण हा सर्व अनुबंध महात्मा गांधींच्या नेतृत्वाशी आहे. वर्ध्याच्या सुदैवाने आणि जमनालालजींच्या स्नेह-सौहार्दाने महात्मा गांधी वर्ध्याला आले आणि जमनालालजींच्या पुत्रकर्तव्याला भरतीच आली. महात्मा गांधींनी सांगावे आणि जमनालालजींनी ते करावे ! संकल्प गांधींचा, यत्न, सिद्धी जमनालालजींची ! असे सतत चालूच होते.

सतत कार्यरत राहूनही त्यांचे आत्मपरीक्षण सुरूच होते. गीतेचा १७ वा अध्याय सतत त्यांच्या डोळ्यासमोर येत राहिला. आणि त्याच अनुषंगाने ते आपले काम तोलू लागले. देहाचे, वाणीचे, मनाचे तप आणि आपले काम याची जणू ते तुलना करू लागले. "प्रसन्नवृत्ति सौम्यत्व आत्मचिंतन संयम । भावना राखणे शुद्ध" या पंक्तीप्रमाणे आपल्या हातून कितपत घडते, याचा हिशेब ते करू लागले. " निःसंग निरहंकारी उत्साही धैर्यमंडित । फळो गळो चळेना तो । कर्ता सात्त्विक बोलिला " या दृष्टीतून ते अधिकाधिक अंतर्मुख होत गेले. उद्यमी ऐहिकाचा, धनद्रव्याचा हिशेब करतो; संयमी आतला हिशेब चोख आहे की नाही, ते बघतो.

तनामनाच्या या तगमगीत १९३८ मध्ये त्यांनी आपल्या पित्याला जे पत्र लिहिले ते फार बोलके आहे :—

"आज मला ५० वे वर्ष लागत आहे. आपला आशीर्वाद तर सदैव मिळतच आहे. पण आपल्या आशीर्वादाला मी पात्र नाही, असे मला गेल्या दोन-अडीच वर्षांत वाटू लागले आहे. माझ्या दोषांचा विचार जेव्हा मी करू लागतो, तेव्हा माझ्या मनात आत्म-हत्येचे सुद्धा विचार येतात. आत्महत्या करणे पाप आहे—भित्रेपणाचे कृत्य आहे, असे मी मानीत आलो आहे. आणि बौद्धिक दृष्टीने मी तसेच मानीत आहे. पण माझी उन्नति होण्याऐवजी अवनतीच विशेष होत आहे, याचे मला फार दुःख होते. त्यामुळे सर्व सार्व-जनिक कामांतून अंग काढून घ्यावे किंबहुना खाजगी कामांतूनही अलग व्हावे, असा विचार मनात जोर करू लागतो.

"अहिंसा व सत्य यांचे आचरण कमी कमी होत आहे. त्यांचेवरील श्रद्धाही कमी होईल की काय अशी भीती वाटते. त्यामुळे असहनशीलता वाढली आहे. क्रोधाचे प्रमाणही वाढले आहे. काम, लोभ हे रिपुही बळावत आहेत. असे असताना जिवंत राहण्याचा मोह का होतो ? या स्थितीत स्वाभाविक मृत्यूचे निमंत्रण आले, तर मला समाधान व शांती मिळेल, असे वाटते. उलट, आज माझ्या ठायी कोणी असा विश्वास जर

निर्माण केला की 'माझे पतन कधी होणार नाही व सत्याच्या मार्गाविरुद्ध मी कधी मागे हटणार नाही,' तर माझ्या अंगी फिरून नवजीवनाचा उत्साह संचरू लागेल. पण माझी मानसिक स्थिती प्रेमाने सुधारू शकेल असा कोण आहे ?

"आपण व विनोबा यांचेवरच माझा भरवसा होता. परंतु आपल्याबरील आशा आता कमी होत चालली आहे. अजून विनोबांची आशा आहे; कदाचित काही समाधानकारक मार्ग निघेल.

"या वर्षामध्ये मी आपल्याजवळ माझे हृदय मोकळे करण्यासाठी कैकवेळा आलो होतो. परंतु आपली मानसिक, शारीरिक व आसपासची परिस्थिती यामुळे माझे हृदय मी पूर्णपणे खुले करू शकलो नाही. आपल्याला व अन्य मित्रांना मी धोका तर देत नाही ना ? त्याहून मोठे पाप दुसरे काय असू शकेल ? सर्वसाधारण मनुष्यामध्ये माझी गणना व्हावी, असा मार्ग आपण मला दाखवावा. मला तर आपल्याला प्रणाम करण्याचाही संकोच वाटतो."

इतके आरसपानी पारदर्शक लिखाण खूप काहीसे वाचूनही अन्यत्र मिळाले नाही. देहाचे चोज पुरविणाऱ्या ऐहिक वस्तूंना चि. कमलनयनच्या हातून जेव्हा काडी लावली तेव्हापासून एका वेगळ्या ध्यासाने, तगमग-तळमळीने त्यांना अस्वस्थ केले होते. पू. विनोबा वर्ध्याला आले तेव्हा त्यांनी पहिला मंत्र 'आचार्य देवो भव' याचा जप सुरू केला. १९३३ मध्ये महात्मा गांधीजी आल्याबरोबर 'पितृदेवो भव' हा जप सुरू झाला. आणि गांधीजींना काहीही कमी पडू नये, त्यांची कोणतीही संकल्पना अपुरी राहू नये, हा व्याप वाढविता, सांभाळता पूर्णत्वाला आणताना तिसरा जप त्यांनी सुरू केला 'अतिथि देवो भव'. हे सगळे जप अजपाजप होते. म्हणून आपल्याला ऐकू येत नव्हते.

आणखीही एक त्यांच्या चरित्रातील खूण जपण्याजोगी होती. योग्य मार्गदर्शक लाभल्याबरोबर १९२५ मध्ये ते सहकुटुंब साबरमतीला राहायला गेले. देहली दीपकासारखी त्यांची मनोदशा राहूनच गेली. १९२५ मध्येच त्यांनी आपले मृत्युपत्र तयार केले होते. त्यातला आशय महत्त्वाचा नाही. १९२५ मध्ये त्यांचे वय अवघे ३७ वर्षांचे होते. या ऐन उमेदीत मृत्यूची वार्ता पुसण्याजोगे कुठे आढळत नाही, ऐकिवातही नाही. मृत्युंजय मंत्राचा तर ते जप करीत नव्हते ? "उर्वारुकमिव बंधनान् मृत्योर्मुक्षीय मा मृतात् ।।"—मृत्यू यावा कसा ?—तर वेलीवरची काकडी आपोआप गळून पडते, तसा ! कल्पना भव्य. संकल्प तर नुसताच भव्य नव्हे, तर दिव्यच !

या पार्श्वभूमीवर १९३८ चे त्यांचे वर उद्धृत केलेले पत्र पाहिले की, "घेई ओढोनि संपूर्ण विषयातुनि इंद्रिये । जसा कासव तो अंगे त्याची प्रज्ञा स्थिरावली ।।" या 'गीताई' तील श्लोकाची आठवण होते. श्री ज्ञानेश्वरांनी 'ज्ञान' शब्दावर भाष्य करताना ते बुद्धीने कळू शकते, असा निर्वाळा दिला खरा पण ते स्वतःच अंतर्दर्शी असल्यामुळे काही परममोलाचे दृष्टांत त्यांनी दिले. "कां भूमीचे मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार गौरव । सुकुलीनाचे ।।" या दृष्टांताचा प्रत्यय म्हणजेच ज्ञानाचा उदय ! वयाच्या ३७ व्या वर्षी मृत्युपत्र लिहिणारे जमनालालजी मनाच्या कोणत्या अवस्थेत होते, याच्या स्पष्टीकरणासाठीच वरील दृष्टांत !

कर्म योगरूपा आले ! जप झाले; तप झाले ! मार्गदर्शन करणारी माणसे आसपास आहेत. सर्वांचे सर्व सुरळीत आहे, संसाराची जबाबदारी संपली. मुले-मुली जाणती-नांदती झाली. जीवनसहचरी भाझ्या ध्यासकर्मात विलीन झाली आणि 'जसा कासव तो अंगे' हे शब्द त्यांच्या मनात घुमू लागले. चित्तशुद्धीसाठी त्यांनी गांधीजींच्या, विनोबांच्या सूचनेने गोसेवा—गौरक्षण नव्हे—पत्करली.

—आणि अखेरचा दिवस उजाडला. ११ फेब्रुवारी १९४२. मनःशांतीसाठी सर्व पसाऱ्यातून मन निघाले. गोमातेची सेवा करण्याचे व्रत घेतले. त्यासाठी अखिल भारतीय प्रचारासाठी निघण्याची तयारी करीत असलेले जमनालालजी वेगळयाच तयारीला लागले. ११ फेब्रुवारी; दिवस बुधवार, फाल्गुन एकादशी होती. उत्तरायण सूर्य. पाच हजार वर्षांपूर्वी याच तिथीची महाभारताची मंगल विभूती आचार्य भीष्म वाट बघत होती. तिथी, वेळ बरोबर जुळली. भीष्माचार्यांनी देह ठेवला आणि इकडे जमनालालजींची ज्योत विझली. विझण्या-अगोदर सर्व कसे शांत-शांत होते. एकादशीचा फलाहार आटोपला होता. डॉ. राममनोहर लोहियांशी गप्पागोष्टी चालू होत्या. कताईसाठी चरखा काढून ठेवा, असे सांगून जमनालालजी हातपाय धुवायला न्हाणीघरात गेले. चरख्याजवळ बसण्याची उसंत घेतली नाही. कोणाचा विश्वास बसणार नाही इतकी शांत आणि मंगल मृत्युवेला—मंगलमय, शांत शांत ! !

पू. विनोबा आले; गांधीजी आले. वाऱ्यावर बातमी पसरली आणि नाशिवंत देहासाठी तीच रडारड, आक्रंदन सुरू झाले. शांत होता फक्त पिता, शांत होता गुरु ! त्यांचे मनातले कळणार कोणाला ? पण निवृत्तिनाथांना वाटले तसेच गांधीजींनाही वाटले. 'पुत्र मरे बापा आधी । काय करू मी ते सांगा तुम्ही पांडुरंगा ।। '

ज्योत विझली; चिता भडकली. अवघ्या चार-पाच तासात जे घडले ते शास्त्रपूत ! विनोबांनी उपनिषद सुरू केले; परचुरे शास्त्र्यांनी मंत्र म्हटले. आणि महात्मा गांधींचे शांत आक्रंदन सुरू झाले.

धर्मपत्नी जानकीदेवी सती जायला निघाल्या आणि गांधीजींनी त्यांना थांबविले. गांधीजी म्हणाले, "सती गेल्याने लोक आपली पूजा करतील, असे समजू नका. उलट निंदा होईल. शक्य तर योगाग्नीमध्ये आपले शरीर जाळून तुम्हाला सती जाता येईल. त्याला कोण अडविणार? पण ते शक्य नाही. म्हणून मी तुम्हाला सांगतो, जमनालालजींच्या पश्चात तुम्ही त्यांची कार्ये पार पाडा. सती जाण्याचा हाच खरा मार्ग. तुम्ही आपले सारे धन कृष्णार्पण करा व स्वतः भिकारी बना. मुलांनी खाऊ घातले तर खा, नाहीतर माझ्याजवळ या. यापुढे शोक करण्यास तुम्हाला अवकाश नाही."

जानकीदेवींनी ऐकले. आणि त्याक्षणी दोन-अडीच लाखांच्या संपत्तीवर पाणी सोडून त्या जोगीण बनल्या. मोठ्यांचे जीवनही मोठे आणि मोठ्यांचा मृत्यूही मोठाच ! येतात ते शिकत, जातात ते शिकवीत !

सारा ऐहिक कारभार आटोपला. काकाजी गेल्यानंतर पिता काय म्हणाला आणि गुरूचे वचन कोणते एवढेच नमूद करायचे.

पितृवाक्य . . . . आता असा दुसरा पुत्र मी कोठून आणू ? असा पुत्र निघून गेल्यामुळे बाप पंगू बनतो. आज माझी तशीच अवस्था झाली आहे. मगनलाल गेल्यावर माझी जी दशा झाली, तीच आज पुन्हा ईश्वराने माझी केली. त्यातही ईश्वराची काही गुप्त कृपा असेल. माझी आणखीही परीक्षा करण्याचे त्याचे मनात असेल. करू दे माझी परीक्षा. तीत उत्तीर्ण होण्याची शक्ती देणारा तोच आहे.

"आजच्यासारखा प्रसंग माझ्या आयुष्यात यापूर्वी कधी आला नाही आणि पुढेही कधी येणार नाही, असे मला आज विचार करताना वाटते. एखाद्या भिकाऱ्याप्रमाणे . . . . . मी उभा आहे. माझ्या हाती भिक्षापात्र आहे. पण मला धनदौलतीची भीक नको आहे. तशी भीक मी माझ्या आयुष्यात पुष्कळ मागितली आहे. गरिबाची कवडी व अमीराचे करोडो रुपये या सर्वांची मला जरूरी आहे. माझ्या मनात असते तर आज मी जमनालालजींच्या धनिक मित्रांना एकत्र आणले असते. आणि त्यांच्या भावनांना पाझर फोडून त्यांच्या थैल्यांची तोंडे खुली केली असती. हा धंदा सर्व आयुष्यभर मी करीत आलो आहे आणि तो मला चांगला साधलाही आहे.

"तो माझी परीक्षा घेण्यासाठीच माझ्याकडे आला आणि पुत्र म्हणून माझ्या कामाचे सर्व ओझे उचलू लागला. आज तो पुत्र निघून गेल्यामुळे साऱ्या कामाचा भार माझ्या शिरावर पडला आहे."

जेव्हा वीराच्या डोळ्यात पाणी येते तेव्हा ते पाणीच पेटून उठते. पण महात्म्यांच्या डोळ्यात जेव्हा पाणी येते, त्याचे काय होत असेल ? "लवलवते कोंभ" तर नसतील ?

गुरुवाक्य—"गेली २० वर्षे त्यांना सूक्ष्म आत्मनिरीक्षणाची सवय जडलेली होती. पण त्या काळात मनाची जी उन्नत अवस्था त्यांना प्राप्त झाली नव्हती ती गेल्या तीन महिन्यांत त्यांनी मोठ्या त्वरेने मिळविली होती. अलीकडे मी पाहात होतो की, जमनालालजींच्या मनात देहभावनेचा अवशेषही राहिलेला नव्हता—केवळ सेवाच सेवा भरून राहिली होती. याहून अधिक चांगला मृत्यू तो कोणता ? अखेरच्या क्षणापर्यंत सेवा करीत राहणे ही केवढी भाग्याची गोष्ट आहे ! त्यांचे निधन ही दुःखाची गोष्ट नाही—ईर्ष्येची आहे.

"ज्या सेवेचा परिणाम चित्त-शुद्धीमध्ये होतो ती खरी सेवा, असा त्यांचा विश्वास होता. अशा पवित्र अवस्थेमध्ये ज्यांनी आपले शरीर सोडले, त्यांचा मृत्यू झाला असे म्हणता येत नाही; तर त्यांनी लहानसे शरीर सोडून समाजरूपी व्यापक देहामध्ये प्रवेश केला, असे म्हटले पाहिजे. शरीर हे आत्म्याच्या विकासासाठी आहे. परंतु ज्यांचा आत्मा महान बनला आहे, त्यांच्या विकासासाठी मानवदेह लहान पडतो. अशावेळी तो महान आत्मा कधीकधी आपले दुर्बळ शरीर सोडून देऊन देहरहित अवस्थेत अधिक सेवा करू लागतो. जमनालालजींची हीच अवस्था आहे. त्यांच्या मृत्यूने, त्यांच्या पत्नीचे ठायी, आपले सारे जीवन सेवाकार्याला अर्पण करण्याची प्रेरणा उत्पन्न केली. सदेह आत्मा जितका प्रभाव पाडू शकत नाही, तितका विदेह आत्मा पाडू शकतो. महान विभूती देहत्यागानंतर अधिक बलवान होत असतात. संतांची उदाहरणे आपल्यासमोर आहेतच. जीवंतपणी त्यांचा छळ होतो पण मृत्यूनंतर समाजाच्या चित्तावर त्यांचा प्रभाव पडतो. अशा संतांच्या मालिकेमध्ये जमनालालजींचे स्थान, छोटेसे का होईना, पण महत्त्वाचे आहे."



बजाजवाडीमध्ये सहकाऱ्यांसमवेत महात्मा गांधी



कमलनयन बजाज, राजेंद्र प्रसाद, जमनालाल बजाज व सरदार पटेल —बजाजवाडीच्या अंगणात गप्पागोष्टी करताना



राजेंद्र प्रसाद, सरदार पटेल, मौलाना आझाद आणि खान अब्दुल गफार खान बजाजवाडीमध्ये परंपरागत भारतीय पद्धतीप्रमाणे भोजन घेताना



नागपूर कारागृहातून १९२३ साली सुटका झाल्यानंतर जमनालाल बजाजांचे जनतेकडून स्वागत.
जमनालालजींनी अटकेपूर्वी नागपूर झेंडा सत्याग्रहाचे नेतृत्व यशस्वीपणे केले होते

गांधी चौक, वर्धा, येथें मौलाना शौकत अली, डॉ. मुंजे व जमनालाल बजाज

वर्धा रेल्वे स्टेशनवर काँग्रेसचे अध्यक्ष श्री. सुभाषचंद्र बोस यांचे स्वागत करताना पंडित नेहरु,
सरदार पटेल, आचार्य कृपलानी, आर्यनायकम् आणि जमनालाल बजाज

बजाजवाडी येथे सरदार पटेल, राजाजी, जमनालाल बजाज व पंडित नेहरू





चीनचे ज्येष्ठ नेते ताई-चि-ताओ गांधीजींना भेटण्यासाठी वर्ध्याला आले त्यावेळी बजाजवाडी येथे जमनालाल बजाजांसमवेत——नोव्हेंबर १९४०

प्यारेलाल, लुई फिशर (गांधीजींच्या जगप्रसिद्ध चरित्राचे लेखक), गांधीजी, राजकुमारी अमृत कौर आणि जमनालाल बजाज सहज फेरफटका करताना——वर्धा येथे

वर्ध्याला झालेल्या अ. भा. कांग्रेस समितीच्या अधिवेशनाला उपस्थित राहण्यासाठी प्रस्थान करताना राष्ट्रीय नेते.
स्वयंसेवक प्रमुख रामकृष्ण बजाज त्यांना मार्ग दर्शविताना--जानेवारी १९४२

व्यक्तिगत सत्याग्रह आंदोलनासाठी (१९४०) पहिले सत्याग्रही म्हणून गांधीजींकडून निवड झाल्याबद्दल
विनोबा भावे यांचा सत्कार. अध्यक्षस्थानी जमनालाल बजाज





सत्याग्रह आश्रम (आता महिलाश्रम), वर्धा, येथे गांधीजी. वर्ध्याला आल्यानंतरचे त्यांचे पहिले निवासस्थान

बापू कुटी, सेवाग्राम



हरिजनांसाठी खुले केले गेलेले
भारतातील पहिले मंदिर—
वर्ध्याचे लक्ष्मीनारायण मंदिर.
हरिजनांच्या तुकडीचे नेतृत्व
विनोबाजींनी केले होते



मगन संग्रहालय, वर्धा

राष्ट्रभाषा प्रचार समिती, वर्धा——मुख्य कार्यालय



पवनार आश्रमातील प्रार्थनेच्या वेळी विनोबा भावे, जानकीदेवी बजाज, मनोहर दिवाण,
बाबाजी मोघे, श्रीमन नारायण, मदालसा नारायण आणि इतर

गीताई मंदिर, गोपुरी, वर्धा



गीताई मंदिराच्या उद्घाटनप्रसंगी विनोबा भावे--७ ऑक्टोबर १९८०

गीताई मंदिराच्या प्रवेशस्थानी विनोबाजी




वर्धा येथील गांधी ज्ञानमंदिराच्या उद्घाटनाच्या वेळी पंडित नेहरू व जानकीदेवी बजाज



शिवाजी भावे, विनोबा भावे आणि बाळकोबा भावे



जमनालाल बजाज—गांधीजींचे 'पाचवे पुत्र' व गांधीजीप्रणित रचनात्मक कार्यक्रमाचे प्रमुख आधारस्तंभ



श्रीकृष्णदास जाजू—खादी प्रसार कार्याचे प्रमुख नेते





आर्यनायकम् व आशादेवी आर्यनायकम्—' नई तालीम ' कार्यास पूर्णपणे वाहून घेतले



डॉ. जे. सी. कुमारप्पा——खादी व ग्रामोद्योगाचे अध्वर्यू



श्रीमन नारायण——सुप्रसिद्ध गांधीवादी अर्थशास्त्रज्ञ आणि हिंदुस्थानी प्रचार व मूलभूत शिक्षण कार्याचे खंदे कार्यकर्ते



किशोरलाल मश्रूवाला——सुप्रसिद्ध गांधीवादी विचारवंत



मनोहर दिवाण——जमनालाल बजाज यांच्या साह्याने दत्तपूर, वर्धा, येथे कुष्ठरोग्यांच्या सेवेसाठी कुष्ठधाम सुरू केले

पितृवचन, गुरुवचन, आप्तवचन उद्धृत केल्यानंतर हा ग्रंथ आटोपला. या ग्रंथाचे बावन अध्याय ! हाही योगायोगच !

सरस्वती गंगाधरांनी 'गुरुचरित्र' रचिले. गुरुभक्तांचा तो आदर्श ग्रंथ ! त्यातला प्रत्येक शब्द मंत्रमय आहे, ही गुरुभक्तांची निष्ठा ! गुरुचरित्राचे एकूण अध्याय बावन !

पंडित जगन्नाथाने आत्मोद्धारासाठी गंगेचे स्तवन केले. पंडितांची 'गंगालहरी' तारक आणि पावन आहे. त्यातील श्लोकांची एकूण संख्या बावन !

भूषण कवीची एका महापुरुषाच्या प्रभावाने प्रतिभा जागी झाली. त्यांनी राजा शिवछत्रपतींवर कवने रचिली. या कवनांची एकूण संख्या बावन !

अध्यात्मात 'बावन' या आकड्याला काहीतरी महत्त्व असावे. कोणतातरी योग साधला जात असावा. याच योगायोगात जमनालालजींची ही 'आयुर्बावनी' येऊ शकेल काय ?

तर मग ही 'आयुर्बावनी' अर्पण कोणाला करायची ? लो. टिळकांनी आपले कर्मसिद्धांताचे गीता रहस्य—"समर्पये ग्रंथमिमं श्रीशाय जनतात्मने । अनेन प्रीयतां देवो भगवान पुरुषः परः ।। " या भावनेने अर्पण केले. पण ही 'आयुर्बावनी' कधीचीच पितृचरणी, गुरुचरणी समर्पित झाली होती. यास्तव भगवंताला नमस्कार, हाच लेखनालंकार !

**यस्य स्मरणमात्रेण जन्मसंसार बंधनात्**
**विमुच्यते नमस्तस्मै विष्णवे प्रभवविष्णवे ।।**

# ह्या योगक्षेमु आघवा

उत्क्रांतीचे पर्यवसान कल्याणमय जीवनात व्हायला हवे. क्रांतीचे पर्यवसान शांतीपूर्ण जीवनात व्हायला हवे. पण आज 'क्रांती' शब्द उच्चारला तर डोळ्यासमोर वेगळेच काही उभे राहते.

'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवीनच' ह्या लो. टिळकांच्या गर्जनेने भारताच्या क्रांतीला सुरुवात झाली. ही प्रक्रिया समजवून घ्यायला प्रस्तुतच्या अनु-षंगाने थोडे मागे जायला हवे. लो. टिळक 'मासेस' वर अवलंबून होते. 'क्लासेस' त्यांच्याबद्दल चांगले बोलत नसत. सर्वसाधारण जनतेला तिच्या शक्तीची जाण देऊन तिच्यात धैर्य, हिंमत निर्माण केली ती लो. टिळकांनी. म्हणून ते 'लोकमान्य' झाले.

स्वराज्याची त्रिसूत्री म्हणून स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण त्यांनी मांडली. प्रचार धुमधडाक्यात सुरू झाला. काहींनी प्रतिसाद दिला. पण या 'तेल्यातांबोळ्यां'च्या पुढाऱ्याला त्यावेळच्या सुशिक्षितांनी साथ दिली नाही. हा सुशिक्षितवर्ग इंग्रजी शिक्षणाने सामान्य जनतेपासून वेगळाच राहू इच्छित होता. त्यांना त्यात ऐहिक लाभ दिसत होता. त्या सुशिक्षितांनी चर्चा आणि वादविवादाचे जणू आव्हान स्वीकारले. राष्ट्रीय शिक्षण म्हणजे काय, असा सवाल ते विचारू लागले. कसलाही धोका न पत्करता आपण तेवढे सुरक्षित रहावे, हीच त्यांची भावना होती. इंग्रज जसे सामान्य जनतेच्या दूर राहून शासन करीत तीच चाल यांनी स्वीकारली होती. ते विचारू लागले की, सध्याच्या शिक्षणात दोन + दोनची बेरीज चार होते ती तुमच्या राष्ट्रीय शिक्षणात पाच होईल काय ?

याला उत्तर होते. पण ते प्रतिवादाचे नव्हे, तर प्रत्यक्ष कृतीचे ! तिला वेळ होता. कारण शब्द जसे शीघ्र निघतात तशी कृती शीघ्र असू शकत नाही. लो. टिळक तुरुंगातून सुटून आल्यावर सामान्य जनतेला हुरूप आला आणि जाणते लोकही त्यांच्या बाजूने होऊ लागले. टिळक गर्जतच होते. या गर्जनेला वेळ कमी मिळाला. सहा वर्षे तुरुंगात काढून लो. टिळकांनी गीतेचे रहस्य शोधले. पण तदनुसार कर्म करण्यासाठी त्यांना अवधी मिळाला केवळ पाच वर्षे. १९२० मध्ये लो. टिळक इहलोक सोडून गेले. टिळक अध्याय संपला !

तथापि भारतमातेवर धाय मोकलून रडायची पाळी आली नाही, हे प्राक्तन ! कारण एक व्यक्ती १९१५ साली भारतात आली. दक्षिण आफ्रिकेत एका नव्या तत्त्वाने अभिनव यश मिळवून ती भारतात आली. ती व्यक्ती म्हणजे महात्मा गांधी ! दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रही विजयामुळे त्यांच्या भोवती वलय निर्माण झाले होते. त्यांनी भारतात येऊन पहिले काम कोणते केले असेल तर ते टिळक स्वराज्य फंडाचे ! आपल्या गुरूच्या सांगण्यावरून ते सबंध भारतभर फिरले. सामान्य लोकांशी संपर्क साधला आणि जनतेची नाडी तपासली. तिला औषधाची गरज होती. औषध द्यायचे ते कोणते ? लो. टिळकांचा मार्ग अनुसरून एका अभिनव क्रांतीचा पर्याय त्यांना सुचला.

लोकसंपर्कामुळे त्यांच्या लक्षात पहिली गोष्ट शिरली ती म्हणजे सामान्य जनतेत 'भूक' फार वखवखली आहे आणि या भुकेचे स्वरूप अगदीच वेगळे आहे. निखळ भूक असती तर त्यातून क्रांती घडवून आणता आली असती. पण असल्या क्रांतीसाठी भृगुऋषीप्रमाणे "अन्नं

ब्रह्मेति व्यजानामि । " असे या भुकेचे तत्त्वज्ञान तयार करणे शक्य नव्हते. कारण सामान्य जनतेच्या ह्या भुकेतून दोन रोग अगोदरच साथीसारखे फैलावले होते. ते म्हणजे भीक आणि चोरी ! लाचार जनता 'बुभुक्षित: किं न करोति पापम्' या पातळीवर आली होती. भित्रा चोर भीक मागायचा आणि धीट भिकारी चोरी करायचा. भूक आणि उपवास यातील फरक ओळखून महात्मा गांधींना भारत स्वतंत्र करायचा होता. दक्षिण आफ्रिकेत त्यांनी जे जे म्हणून व्यक्तिगत व समष्टिगत प्रयोग केले ते भारतात लागू होतात की काय, त्याचा तपास महात्मा गांधी घेऊ लागले. सशस्त्र क्रांती तर अशक्यच होती. लो. टिळकांनाही ते पटले होते. 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले ?'—हे खरेच ! पण या रणाची व्याख्या बदलविणे अपरिहार्य होते. लो. टिळक व महात्मा गांधी या दोघांच्याही वेळी भारताची लोकसंख्या तीस कोटी होती आणि ह्या तीस कोटी लोकांवर सत्ता चालवीत होते फक्त दीड लक्ष इंग्रज ! असे हे भारताचे पारतंत्र्य ! दीड लक्ष सशस्त्र सैनिक तयार करून इंग्रजांशी लढणे शक्य होते ? नाही, कारण ह्या भूक, लाचारीपायी इंग्रज याच देशातून आपल्या देशी लोकांशी लढायला यात्र भारतीयांमधून तीन लक्ष सशस्त्र सैनिक उभे करू शकत होते. महात्मा गांधींच्या हे लक्षात येताच त्यांनी या भुकेलाच वळण देण्याचे ठरविले. एक तर ही भूक भागेल असा उपाय सुचविणे आणि भुकेचेच उदात्तीकरण करणे !

क्रांती करायची तर तिला काही तत्त्वे असावी लागतात. भारताला स्वतंत्र करणे हे साध्य ! त्याच्यासाठी साधने, त्यांचे नियोजन, त्यांचा क्रम असे एक शास्त्र बनवावे लागते. महात्मा गांधींचा व्याकरणावर विश्वास होता. 'मी' चे अनेकवचन 'आम्ही' होते, हे त्यांना ठाऊक होते. म्हणूनच त्यांनी साधने, योजना, क्रम यांचे शास्त्रच बनवून टाकले. गरिबाकडे जायचे तर आपण स्वत:च गरीब झाले पाहिजे. नव्हे, ते अपरिहार्यच आहे. त्यासाठी आहार, विहार, वर्तन सगळेच बदलायला हवे. हेच त्यांना राष्ट्रीय शिक्षणातून शिकवायचे होते. लो. टिळकांच्या त्रिसूत्रीला त्यांनी सोडले नाही. तिच्यात त्यांनी वेगळाच आशय आणला. धर्म आणि व्यवहार, साध्य आणि साधने हा महात्मा गांधींसाठी चर्चेचा विषय मुळीच नव्हता. देऊळ, राऊळ हे त्यांना समान करायचे होते. ईश्वरावर त्यांची नितांत श्रद्धा होती. लहान मूल जसे काही करायचे तर आईला विचारून करते तसे ते सर्वच ईश्वराला विचारून त्याच्या साक्षीने करायचे ! एकच उदाहरण घेणे पुरेसे होईल. लो. टिळकांच्या 'स्वदेशी' मध्ये परदेशी कापडाचा बहिष्कार, आपल्या देशात बनलेल्या कापडाचा वापर एवढेच अनुस्यूत होते. त्यावेळी पुष्कळ सुशिक्षितांनी स्वदेशीचे व्रत घेतले व साधी रहाणी पत्करली, हे भारताचे सुदैवच. स्वदेशीच्या व्रतापायी चहा-साखरेपासूनचे पथ्यपाणी त्यांनी पत्करले आणि त्यात त्यांना विलक्षण तृप्तीचा आनंद मिळाला. हा आनंद स्वत: अनुभव घेऊन त्यांनी कमावला. लोकांची दु:खे समजावून घेण्याची समज त्यांना आली.

'स्वदेशी'बद्दलच सांगायचे होते. महात्मा गांधींनी 'हिंद स्वराज' मध्ये (१९०६) स्वदेशीचा जो अर्थ स्पष्ट केला तो ईश्वराला स्मरून केला, असे वाटू लागते. 'हिंद स्वराज' वरूनच सहज एक आठवण झाली—भारत स्वतंत्र झाल्यानंतर लागलीच घटना समिती स्थापन झाली आणि महात्मा गांधींना विचारले की, भारताची घटना कशी हवी ? तेव्हा त्यांनी मोठे सूचक उत्तर दिले. " मी 'हिंद स्वराज' मध्ये माझे विचार मांडले त्यातील एकही अक्षर बदलविण्याची गेल्या चाळीस वर्षांत मला गरज वाटली नाही व वाटतही नाही. "

ही स्वदेशीची व्याख्या काय होती ? " स्वदेशी इज दॅट स्पिरिट विदिन अस विच् रिस्ट्रिक्टस् अस टू दि युज अँड सर्व्हिस ऑफ अवर इमिजिएट सराउंडिंग्ज टू दि एक्स्ल्युजन ऑफ मोअर रिमोट '. यातील ' स्पिरिट ' म्हणजे अंतरोत्कट भावना ! ' विदिन ' म्हणजे आपल्यातच अंगभूत असलेली ! ' रिस्ट्रिक्टस् ' म्हणजे सेवेला मर्यादा पाडायला लावणारी ! ' इमिजिएट सराउंडिंग ' म्हणजे अतिनिकट हाताजवळचे सेवाक्षेत्र ! ' एक्स्ल्युजन ' म्हणजे दृष्टी न टाकणे ! हे शब्द लक्षणीय आहेत. गांधीजींच्या या स्वदेशीव्याख्येला आपल्या परंपरेत भक्ती आणि सेवा म्हणतात. या भक्तीच्या मर्यादा महात्मा गांधींनी स्पष्ट केल्या आहेत.

त्यामुळे झाले काय ?—तर बहिष्काराची पोकळी निघून गेली आणि राष्ट्रीय शिक्षणात आशय भरून गेला. किमान अपेक्षेने पाऊल उचलायचे आणि कमाल गतीने स्वातंत्र्याकडे जायचे, ही त्यांची वाटचाल होऊन बसली.

भारत स्वतंत्र करण्यासाठी जोखून, पारखून त्यांनी जी तत्त्वे स्वीकारली त्यातून एक दिसून येते की, नुसती सत्याग्रहात्मक क्रांती करून भारत सुखी होणार नाही. ' समग्र क्रांती ' हा पुढे जयप्रकाशजींनी घोषणा दिलेला शब्दच त्यांना अभिप्रेत होता. वाणी, वर्तन, कृती—समग्र क्रांती आणि स्वराज्य—पू. विनोबांनी महात्मा गांधींचा सर्व आशय समजून स्वातंत्र्य, सत्याग्रह, आश्रमीय जीवन यांसाठी आवश्यक व्रतेच छंदबद्ध करून टाकली आणि सकाळ-संध्याकाळ त्या व्रतांचा उच्चार आश्रम जीवनात महात्मा गांधींनी ठरवून टाकला.

> **" अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, असंग्रह ।**
> **शरीरश्रम आस्वाद सर्वत्रभयवर्जन ।।**
> **सर्वधर्मी समानत्व स्वदेशी स्पर्शभावना ।**
> **ही एकादश सेवावीं नम्रत्वे व्रतनिश्चये ।।**

या व्रताचरणातील ' नम्रत्वे ' हा शब्द दोघांनाही अभिप्रेत होता. कारण आपण काहीतरी करतो आहोत, हा अहंकार टाळणे अत्यंत आवश्यक होते.

वरील तत्त्वानुसार महात्मा गांधींपासून संकल्पना घेऊन आणि पू. विनोबांना साक्षी ठेवून " व्याचिष्टे बहुउपायैः यतेमहि स्वराज्ये " या वचनाप्रमाणे उपाय योजून ज्या संस्था निघाल्या त्यांचा उल्लेख, वरील सर्व अनुषंग लक्षात घेऊनच करावयाचा आहे. महात्मा गांधींनी कल्पना मांडायची, पू. विनोबांनी ती परिशुद्ध करायची आणि जमनालालजींनी तिला आकार द्यायचा, असे सुरू झाले.

' सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे । परंतु तेथे भगवंताचे अधिष्टान पाहिजे '—असे अधिष्ठान वर्ध्याला आपोआपच लाभले. ते म्हणजे—

(१) **श्री लक्ष्मीनारायणाचे मंदिर.**—जमनालालजींचे आजोबा सेठ बछराजजींच्या व आजी सदीबाईंच्या इच्छेनेच हे मंदिर १९०७ मध्ये उभे झाले. पुढे होऊ घातलेल्या चळवळीला अधिष्ठान द्यायला साक्षात् जगद्धाता आणि जगद्धात्री वर्ध्याला येऊन बसली. श्री लक्ष्मीनारायणाचे दर्शन घेण्याचा जमनालालजींचा नित्यक्रम होता. प्रतिदिन दर्शनाचे वेळी ते काय मागत असतील, हा अंदाज त्यांच्या चरित्रावरून घेता येतो.

या श्री लक्ष्मीनारायण मंदिराने एक नवल घडविले. त्याअगोदर भारतामधील कोठल्याही शहरात हे घडले नव्हते. १७ जुलै १९२८ रोजी हे मंदिर हरिजनांना खुले झाले. यासाठी जमनालालजींना किती विरोध झाला आणि त्यांनी तो किती धैर्याने परतविला, हा इतिहास झाला. त्यावेळच्या त्यांच्याच जातीच्या सनातनी मंडळींनी त्यांना बहिष्कृत केले. हरिजन मात्र शांतपणे मंदिरात जाऊन देवदर्शन करून तृप्त होत होते. जरा दूरवर उभा असलेला सनातनींचा मेळावा काही करू शकला नाही. मंदिराच्या महाद्वाराशी जमनालालजी प्रसन्न मुखाने हात जोडून उभे होते. आपल्याकडून काहीतरी प्रतिकार व्हावा या अपेक्षेने रस्ता झाडत असलेल्या भंगीमंडळींनाही सनातन्यांनी पैसे देऊन मंदिराकडे पिटाळले. अपेक्षा अशी की, काहीतरी गडबड गोंधळ व्हावा. पण सर्व व्यवस्थित पार पडले.

भगवंताचे अधिष्ठान प्राप्त झाल्यावर जमनालालजी वळले ते विद्यार्थी आणि त्यांचे शिक्षण, या दोन विषयांकडे ! वर्ध्यातच नव्हे तर जागोजागी छात्रावासाचा उपक्रम तर केलाच पण १९१० साली वर्ध्याला—

(२) **मारवाडी शिक्षा मंडळाची स्थापना केली.**—शिक्षणविषयक सर्व सुधारणा त्यांना अभिप्रेत असल्यामुळे या मंडळांतर्गत १९१२ मध्ये त्यांनी **मारवाडी हायस्कूल** सुरू केले. या हायस्कूलची इमारत भव्य, देखणी व सर्व शिक्षणविषयक सोयी पाहून तयार केली गेली आणि इतकी वर्षे लोटल्यानंतर देखील ती देखणी वास्तू तशीच आहे. सध्या तेथे जानकीदेवी बजाज विज्ञान महाविद्यालय भरते. मारवाडी विद्यालयाचे, पुढे गांधीजी आल्यानंतर **'नवभारत विद्यालय'** झाले आणि १९३७ मध्ये शिक्षणतज्ज्ञांची परिषद भरल्यावर विचार-विमर्श होऊन नवीन शिक्षणाचा उपक्रम सुरू केला. आचार्य आर्यनायकम् यांच्यावर ही जबाब-दारी सोपविली गेली. ते कार्याला लागले. त्यांची अन्य कामी योजना झाल्यानंतर आचार्य श्रीमन्नारायण यांनी प्रमुखत्वाची धुरा सांभाळली. १९४२ च्या चळवळीत तेथील विद्यार्थी आणि शिक्षक तुरुंगात गेल्यामुळे विद्यालय बंद पडले आणि ते पुढे सुरू न करता त्या ठिकाणी **गोविंदराम सेकसरिया वाणिज्य महाविद्यालय** सुरू झाले. प्राचार्य श्रीमन्नारायण यांचे सौजन्य व परिश्रम येथेच सर्वांच्या प्रत्ययास आले. पुढे अशाच प्रकारची अर्थ, वाणिज्य महा-विद्यालये नागपूर आणि जबलपूर येथे सुरू करण्यात आली. शिक्षा मंडळाच्या कार्याचा विस्तार झाला. छात्रावास नव्याने सुरू झाले. मारवाडी विद्यालयाला सुविचारोन्मुख करताना कै. दामले गुरुजी यांचा उल्लेख अपरिहार्य आहे आणि छात्रावासाची चळवळ पित्याच्या प्रेमाने आणि शिक्षणाच्या शिस्तीने ज्यांनी सहज पेलली ते कै. ग. ह. शिंडे यांचेही स्मरण करणे अगत्य आहे. योग्य कामासाठी योग्य माणसे शोधण्याची कला जमनालालजींना कुमारवयापासूनच साधली होती, हे खरे !

या दरम्यान वर्धा शहरात आणखी एक हायस्कूल काढण्याचा उपक्रम श्री. श्रीकृष्ण जाजू व जमनालालजी यांनी केला. ते **न्यू इंग्लिश हायस्कूल**. ते आजही वर्ध्याला नांदत, डोलत आहे.

या शिक्षण संस्थांचा अद्यावत इतिहास येथे अभिप्रेत नाही. काही आगळेवेगळे केले गेले तेच द्यायचे ! वर्ध्याच्या गो. से. कॉमर्स कॉलेजने महात्मा गांधींच्या प्रेरणेने धिवसा घेऊन १९४५ मध्ये मातृभाषा माध्यमाचा महाविद्यालयीन शिक्षणात पहिला प्रयोग केला व तो यशस्वीही करून दाखविला. महात्मा गांधींचा आशीर्वाद होता. पू. विनोबांचे मार्गदर्शन होते

आणि शिकविणारे शिक्षक आपापला विषय जाणत होते. मराठी आणि हिंदीतून सर्व शिक्षण सुरू व्हावे. फक्त एक विषय म्हणून इंग्रजीचा अभ्यास व्हावा, एवढीच अपेक्षा होती. तांत्रिक परिभाषा नव्हती; क्रमिक पुस्तके नव्हती. फक्त आत्मविश्वास होता. १९४९ मध्ये बी.कॉम. च्या पदवी परीक्षेला बसणाऱ्या मुलांचा प्रथम स्नातकपथक अभिनंदन समारोह २४ डिसेंबर १९४९ मध्ये डॉ. राजेंद्र प्रसाद यांच्या अध्यक्षतेखाली आणि त्यावेळचे मध्य प्रदेशचे राज्यपाल माननीय मंगलदास पक्वासा यांचे उपस्थितीत साजरा झाला. त्या विजयाच्या आनंदात सर्वांनाच प्रेरणा देणाऱ्या महात्मा गांधींची आठवण झाली. डॉ. राजेंद्रबाबूही गहिवरले. त्यांच्यासहित या स्नातक पिढीचे छायाचित्र अजून डोळ्यापुढे येते. मराठीतून आणि हिंदीतून अभ्यास करून नागपूर विद्यापीठाची पदवी घेतलेली ही पिढी जीवनात पुढे आणि पुढेच जात गेली. त्यांनी जीवन यशस्वी तर केलेच पण मोठमोठी पदेही भूषविली. इंग्रजीच्या अभावी त्यांचे कोठे कधीच अडले नाही. महाराष्ट्राचे बारा वर्षे शिक्षण मंत्री असलेले श्री. मधुकर धनाजी चौधरी हे याच तुकडीतील होते आणि पदवी परीक्षेपर्यंतचे सर्व शिक्षण त्यांचे मराठीतूनच झाले होते.

या यशस्वी प्रयोगाने आणखी एक काम झाले. नागपूर विद्यापीठाने हा उपक्रम उचलून धरला आणि उदाहरण घालून दिले. नागपूर विद्यापीठाचे हे दुसरे धाडस ! हैद्राबादच्या विद्यार्थ्यांना निजामी सल्तनीत जेव्हा निर्वासित व्हावे लागले तेव्हा त्यांना आश्रय दिला तो नागपूर विद्यापीठानेच ! त्यांपैकी एक विद्यार्थी माननीय पी. व्ही. नरसिंहराव हे आजमितीला केंद्रीय मंत्री आहेत. 'सामर्थ्य आहे चळवळीचे जो जो करील तयाचे' हेच खरे. ज्याला नाचता येते त्याचे अंगण कधीच वाकडे नसते !

शिक्षणाचा हा असा व्याप तोलीत, पेलीत, फुलवीत जमनालालजी सार्वजनिक कामात रस व यश घेत होते. या दरम्यान रावबहादुरीही त्यांच्या पदरी पडली होती. नागपूरच्या काँग्रेस अधिवेशनाचे ते स्वागताध्यक्ष झाले. मार्गदर्शक पिता त्यांना लाभला आणि या पित्याने वर्ध्याच्या भाग्ययोगाने पू. विनोबांना वर्ध्याला पाठवून दिले. येथून वर्ध्याच्या संस्था अखिल भारतीय अशा झाल्या. एक आदर्श संस्था म्हणून अनेक आदर्श संस्था, असे व्याकरणातील अनेकवचन खरे होऊ लागले. प्रेरणा गांधींची, शास्त्र विनोबांचे आणि कृती जमनालालजींची, अशा क्रमाने हे अनेकवचन ! पू. विनोबा सन १९२१ मध्ये वर्ध्याला आले. एकटे आले नाहीत. त्यांचेबरोबर त्यांचे चार मित्र आले: (१) श्री. बाबाजी मोघे, (२) श्री. गोपाळ नरहर काळे, (३) श्री. रघुनाथ श्रीधर धोत्रे, (४) श्री. द्वारकानाथ विष्णू लेले. हे अनेकवचन लाभले म्हणून जमनालालजींच्या कृतीशौर्याला जणू भरते आले !

पू. विनोबांचा परिचय देण्याचे कारण नाही. तेवढी शक्तीही नाही. विनोबा कोण याचे उत्तर मिळायला कदाचित आणखी पाचपंचवीस वर्षे जाऊ द्यायला हवीत. महात्मा गांधींना त्यांनी परम आप्त मानले. जीवनगुरूसारखा त्यांना मान दिला. त्या महात्मा गांधींनाच समजून घ्यायला अशीच पाचपंचवीस वर्षे जावी लागणार आहेत. महात्मा गांधींची हत्या झाल्यानंतर आईन्स्टीन सारख्या शास्त्रज्ञाने उद्गार काढले, "महात्मा गांधी नावाचा एक मनुष्य जगाच्या पाठीवर होऊन गेला यावर देखील कोणाचा विश्वास बसणार नाही." पंचमढी येथील समाजवाद्यांच्या मेळाव्यात डॉ. राम मनोहर लोहिया यांनी

जे अध्यक्षीय भाषण दिले ते अति मोलामहत्त्वाचे होते असे म्हटले गेले. डॉ. लोहिया उद्गारले की, " विसाव्या शतकाने दोनच गोष्टी आपल्याला दिल्या. एक अणुबॉम्ब आणि दुसरी महात्मा गांधी ! " विज्ञानाची प्रगती जसजशी विध्वंसक होईल तसतशी गांधींना समजून घेण्याची गरज अधिकाधिक निकडीची होईल. श्रीमद्‌भागवत पुराण श्रीधराच्या भाष्याशिवाय जसे आकलन होत नाही तसेच गांधीजींचे तत्त्वज्ञान विनोबांच्या भाष्याशिवाय उलगडत नाही. विनोबांची वृत्ती कशी होती, हे एका उदाहरणावरूनच सांगता येईल. हा प्रसंग जमनालालजींच्या चरित्रात आलेला आहे.

"तुमसे बढकर पूज्य आत्मा मेरे जानकारी में नहीं है" हे वाक्य पू. विनोबांबद्दल लिहिलेले ! ते कोणाचे ? महात्मा गांधींनी विनोबांना लिहिलेल्या एका पत्रातले हे एक वाक्य आहे. पत्र विनोबांच्या हाती पडले आणि त्यांनी ते वाचून लगेच त्याचे तुकडे तुकडे करून बाजूला टाकले. विनोबांना अशी सवयच होती की, पत्राचे उत्तर लिहून झाले किंवा आशय समजला की पत्राचे जीवन संपवायचे. त्या पत्राचे तुकडे बघितले ते विनोबांकडे शिकत असलेल्या कमलनयनने ! पत्रातील अक्षरावरून त्याच्या लक्षात आले की, हे पत्र बापूंचे आहे. त्याने कपटा कपटा जुळवून त्यातील शब्द वाचले. बालभावनेने त्याने विनोबांना विचारले, " हे काय केले ? पत्र कशाला फाडले ? हे पत्र बापूंचे आहे ". विनोबांनी सहज सुहृद उत्तर दिले—" ज्या वस्तूचा मला उपयोग नाही ते भविष्यकाळासाठी मी कशाला राखून ठेवू ? बापू मोठे आहेत. त्यांच्या महान दृष्टीला मी जसा दिसलो तसे त्यांनी लिहून टाकले. पण माझ्या उणीवा त्यांनी कोठे पाहिल्या आहेत ? "

जमनालालजींच्या पत्नी जानकीदेवी यांना पू. विनोबांनी पत्र पाठविले त्यात " संसार मिथ्या मानून बसलेला मी एक रसहीन माणूस. तिथल्या नैसर्गिक आनंदात मी कदाचित मिठाचा खडा झालो असतो. रविबाबूंनी एक गाणे लिहिले आहे. त्यात म्हटले आहे 'एकला चालो, एकला चालो, ओरे मोरे उपभागा'. अरे, भाग्यहीना ! तू एकटाच चाल ! हे गाणे मी नेहमी मला लागू करतो—पण 'अरे भाग्यहीना !' असे मात्र म्हणत नाही. 'अरे भाग्यवंता' असे म्हणतो ! "

खुद्द जमनालालजींना लिहिलेल्या एका पत्रात आपल्या जीविताचे त्रिभुवन तीन शब्दांत कसे साठविले आहे, हे त्यांनी कळविले होते. " माझ्या मानसिक शब्दकोशात आई, गीता आणि तकली हे तीन शब्द अक्षरशः समानार्थक झाले आहेत. 'आई' शब्दात माझी घरची सर्व कमाई साठवली जाते. 'गीता' शब्दात वेदांपासून संतांपर्यंत जितके अध्ययन केले ते सर्व येते आणि 'तकली' त बापूंसारख्यांच्या संगतीचे सार उतरते. "

"माझी इच्छा म्हणा की वासना म्हणा की विचार म्हणा, मला दोनच गोष्टी करण्याविषयी प्रेरणा देतो. एक देवाचे नाव घ्यावे व दुसरे दिवसभर कातावे. ह्याशिवाय तिसरी प्रेरणाच मला होत नाही. शिकवणे, लिहिणे, चर्चा, व्याख्याने इत्यादि सर्वांची किंमत मला अक्षरशः शून्य वाटते. नामस्मरण आणि कातणे ह्या दोन्हींचा अर्थ मला माझ्याकरिता एकच वाटतो. म्हणून मी या दोन्हीला मिळून १ समजतो. ह्या १ वर शून्य ठेवले तर १०, १०० इ. होतील पण १ चे साहाय्य नसेल तर सगळी शून्ये कुचकामाची होतील. १ ची काळजी मी घ्यावी. शून्याची काळजी करण्यास सर्व दुनिया समर्थ आहे. "

हे असे पू. विनोबांचे विभूतिमत्त्व ! जमनालालजींच्या आनंदाला आणि उत्साहाला भरती येणार नाही तर दुसरे काय होईल ?

पू. विनोबा आल्याबरोबर पहिली संस्था सुरू झाली ती—

(३) **सत्याग्रहाश्रम.**—'आश्रम' हा शब्द भारतीय संस्कृतीत फार प्राचीन आहे. सत्याग्रह महात्मा गांधींचा घडविलेला शब्द. आश्रम शब्द श्रम् = कष्ट करणे, या धातूपासून साधलेला आहे. त्याची व्याख्या अशी—'आश्रम्यन्ति अस्मिन् अनेन वा इति' = ज्यामध्ये ज्याच्या योगाने माणसांना श्रम—तप स्वाध्यायादि कष्ट करावे लागतात. किंबहुना ज्याच्या आधारे कर्तव्यपालनाचे सर्व परिश्रम करावे लागतात तो आश्रम होय. म्हणजे श्रमाला महत्त्व आणि श्रम करीत करीत स्वाध्याय, तप ! गांधीजींनी ते जिथे जिथे राहिले तिथल्या वस्तू—वास्तूला आश्रमच म्हटले. साबरमती, सेवाग्राम हे आश्रमच ! या कल्पनेतून मागे सांगितलेली अकरा व्रते श्रम करीत करीत आत्मसात करणे, हा उद्देश! अहिंसक क्रांतीला ही व्रते आवश्यकच! जेव्हा जेव्हा गांधींना सत्याग्रहाचे आवाहन करावे लागले तेव्हा तेव्हा त्या आंदोलनांत ही सर्व आश्रमी मंडळी सैनिक आणि सेवक म्हणूनच भाग घेत. गांधीजींच्या चळवळीचे रहस्य विशद करताना कोणीतरी उल्लेख केलेला आहे. त्याचा सारांश असा—गांधीजींना आपल्या चळवळीसाठी सैन्य अभिप्रेत नव्हते. अभिप्रेत होते सेवक !—आणि ह्या सेवकांचे शिक्षण सैन्यातील शिपायाप्रमाणे कडक आणि कठोर असायचे. नेपोलियन म्हणायचा की, 'सैन्य पोटावर चालते'. म्हणजे 'पोट' देखील अपरिहार्यच. सशस्त्र सैन्य देखील सर्व दिवस, सर्व तास लढत नसते. पण त्याला सज्ज मात्र ठेवावे लागते व त्याच्या योगक्षेमाची फिकीर करावी लागते. सैन्यासाठी विविध कार्यक्रम, सज्जता, पोटाची व्यवस्था हे शास्त्र असते. सत्याग्रहाचा कार्यक्रम आखल्याबरोबर महात्मा गांधींच्या मनात कल्पना स्फुरली ही वरील युद्धशास्त्राच्या कल्पनेतूनच ! देशभक्तीशिवाय इतर काहीच करायचे नाही, असे जर सेवकांनी ठरविले तर त्यांना नित्य काम आणि कार्यक्रम व त्यांच्या योगक्षेमाची व्यवस्था अपरिहार्यच आहे. असे नित्य काम देणारे राजकारणी फक्त महात्मा गांधीच ! भारतीय स्वातंत्र्याचे युद्धात ज्यांनी पुढाकार घेतला त्यांपैकी कोणालाही असा कार्यक्रम देता आला नाही.

याच कार्यक्रमातून आश्रम संस्था गांधीजींनी पत्करली. जे जे देशसेवा करतील ते आश्रमीच असतील, हे खरे. पण प्राचीन काळापासून या आश्रमाला गृहस्थ संस्थेची गरज भासलीच. मनूचे महत्त्वाचे वचन आहे—

'**यथा वायुं समाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः ।**
**तथा गृहस्थमाश्रित्य वर्तन्ते सर्व आश्रमाः ॥**'

ज्याप्रमाणे प्राणवायूच्या आधाराने सर्व जीव जगतात त्याप्रमाणे गृहस्थाश्रमाच्या आधाराने सर्व आश्रम आपला निर्वाह करतात. 'सत्याग्रहाश्रम' पू. विनोबांच्या हस्ते सुरू केला, हेही एक वैशिष्ट्यच ! जमनालालजींना मात्र त्यांनी शेवटपर्यंत गृहस्थाश्रमातच राहू दिले, हेही विशेषच ! याचा अनुषंग पुढे यायचाच आहे.

आश्रमाच्या शिस्तीबद्दल एकदा महात्मा गांधीच म्हणाले होते की, सेवकांनी असे जीवन घालवावे की, यापुढे तुरुंगात जावे लागले तरी चुकल्यागत वाटू नये आणि ते खरेच !

धुळ्याच्या तुरुंगातून स्वेच्छेने 'क' वर्ग स्वीकारून जमनालालजींनी पत्नीला लिहिलेल्या पत्रात आपली पहाटे ४ पासून रात्री ९-३० पर्यंतची जी दिनचर्या दिली आहे त्यात त्यांनी 'मी सुखात आहे' असाच निर्वाळा दिला. ते आश्रमी जीवनात नव्हते, गृहस्थाश्रमात मुद्दाम राहिले. पण आयुष्याचे वळण 'आश्रमी'च होते. म्हणूनच कणाकणाचा, क्षणाक्षणाचा हिशेब त्यांनी नमूद केला आहे. महात्मा गांधी आणि पू. विनोबाजी यांचा हिशेब असाच होता. सकाळपासूनच्या कर्माचा हिशेब ठेवायचा आणि सायंकाळी प्रार्थनेच्या वेळी तो परमेश्वराकडून तपासून घ्यायचा! अशी शिस्त जीवनात लादून कधी येत नसते. कोणाच्या हुकुमानेही ती येत नाही. स्वयंप्रेरणेने जीवनाला वळण देऊनच ती लाभते. आश्रम संस्थेचा हा अति लोभस लाभ !

पूज्य विनोबांच्या आधिपत्याखाली सत्याग्रहाश्रम सुरू झाला. प्रथम विनोबा आले. ते आजच्या बजाजवाडीच्या एका झोपडीत रहात होते. त्या झोपडीचा उल्लेख यथावकाश येईलच. या आश्रमात अकरा व्रतांची उपासना, हा प्रथम कार्यक्रम. अध्यापन, अध्ययन आणि कृती त्याच अनुरोधाने! या आश्रमातील मंडळी १९३० ते १९३४ या दरम्यान प्रचारासाठी गावोगावी हिंडली आणि परत आल्यावर **ग्रामसेवक मंडळ** स्थापन झाले आणि त्याचे कार्यालय नालवाडी येथे नेण्यात आले. पुढे ३० सप्टेंबर १९४१ ला ते गोपुरीत स्थायिक झाले. ग्रामसेवा, वस्त्रस्वावलंबन, सरंजाम कार्य, गोशाळा, शेती, बागवानी या प्रवृत्तीतून सेवायोग साधला गेला. आश्रम जीवनाला वाहून घेतलेल्या काही मंडळींचे नामसंकीर्तन आवश्यक आहे. सर्वश्री बाबाजी मोघे, गोपाळराव काळे, मोहनलाल झाजेड, सदुभाऊ गद्रे, राधाकृष्ण बजाज, अनसूया बजाज, दत्तोबा दास्ताने, कुंदर दिवाण इत्यादी.

(४) **गांधी चौक : १९२१.**—ही संस्था नव्हे, एक व्यासपीठ! श्री लक्ष्मीनारायण मंदिराशेजारी सेठ बच्छराजजींच्या काळापासून 'दुकान' म्हणून एक संस्था अस्तित्वात आली. जमनालालजी तेथेच रहात असत. या दुकानासमोर प्रशस्त, सुरक्षित असा चौक होता. महत्त्वाची व्याख्याने तिथेच व्हायची. १९४२ च्या आंदोलनात हा चौक एक कायम असे स्मारक बनून गेला. ९ ऑगस्टला मुंबईस गवालिया टँकच्या मैदानात 'करा नाही तर मरा' या मंत्राचा उद्घोष होताच भारताचे सर्व पुढारी म. गांधींसह पकडले गेले व सगळा भारत पेटून उठला. ११ ऑगस्ट १९४२ रोजी वर्ध्याला याच गांधी चौकात प्रचंड सभा झाली. पोलिसांनी ती घेरली. लोक आवरेनात म्हणून गोळीबार केला. त्यात जंगलू नावाचा एक हमाल शहीद झाला आणि या गांधी चौकात त्याच्या नावाने एक चिरा ठेवला गेला. सामान्यातला सामान्य अशिक्षित माणूस असा शहीद होतो याची 'याद' रहावी म्हणून हा गांधी चौक!

म. गांधींच्या प्रवृत्तींना पद्धतशीर उठाव देण्यासाठी कालानुक्रमे आणखी एक संस्था अस्तित्वात आली ती—

(५) **गांधी सेवा संघ : १९२३.**—गांधीजींचा सर्वोदयी विचार शास्त्रशुद्ध करण्यासाठी १९३८ च्या ऑगस्टपासून 'सर्वोदय' नावाची हिंदी मासिक पत्रिका सुरू करण्यात आली. ती नियमित रीतीने जुलै १९४१ पर्यंत चालू होती. संपादक काका कालेलकर व दादा धर्माधिकारी. संपादकांची कोणतीही उपाधी ४८ अंकांपर्यंत

छापली गेली नसल्यामुळे नुसती नावेच दिली आहेत. प्रत्येक अंक हा सर्वोदयी विचार उत्तरोत्तर शुद्ध, प्रगुद्ध करण्याच्या प्रयत्नांनी भरलेला आहे.

'सर्वोदया'च्या पहिल्याच अंकात स्वत: गांधीजींनीच त्यांची सर्वोदयाची कल्पना मूळ हिंदीमध्ये स्पष्ट केली आहे कोणालाही समजण्याजोगी ही हिंदी असल्यामुळे त्यांचेच मूळ पत्र देणे योग्य. गांधीजींच्या भाषेचे भाषांतर अशक्यच आहे हे मागे आलेच आहे.

"सत्याग्रह के सिवा सर्वोदय असम्भवित है। यहाँ का धात्वर्थ लेना चाहिये। सत्य का आग्रह, बगैर अहिंसा के, हो नहीं सकता है। इस लिये सर्वोदय की सिद्धि अहिंसा की सिद्धि पर निर्भर है। तपश्चर्या सात्विक होनी चाहिये। उसमें अविश्रांत उद्यम, विवेक इत्यादि समाविष्ट हैं। शुद्ध तप में शुद्ध ज्ञान होता है। अनुभव बताता है कि लोग अहिंसा का नाम तो लेते हैं लेकिन बहुतों को मानसिक आलस्य इतना रहता है कि वे वस्तुस्थिति के परिचय तक करने का परिश्रम नहीं उठाते हैं। दृष्टांत लीजिये: हिंदुस्तान कंगाल है; हम कंगालियत दूर करना चाहते हैं। लेकिन कंगालियत कैसे हुई, इसका अर्थ क्या है; कैसे दूर हो सकती है, इत्यादि का अभ्यास कितने लोग करते हैं? अहिंसा का भक्त तो ऐसे ज्ञानसे भरा हुआ होना चाहिये।

इस प्रकार का साधन पैदा करना सर्वोदय का कर्तव्य है; नहीं कि किसी के साथ वादविवाद में पडनेका। सर्वोदय के संचालक गांधीवाद भूल जायें। गांधीवाद जैसी कोई वस्तु नहीं है। मैंने कोई नई चीज हिंदुस्तान के सामने रखी नहीं है। प्राचीन वस्तु को नये ढंग से रखी है। उसका उपयोग नये क्षेत्र में करने की चेष्टा की है। इस कारण मेरे विचारोंको 'गांधीवाद' कहना उचित नहीं होगा। हम तो जहाँ मिले वहाँ से सत्य लेंगे; जहाँ देखे वहीं उसकी तारीफ करेंगे। उसका अनुकरण करेंगे। अर्थात 'सर्वोदय' के प्रत्येक वाक्य में अहिंसा और ज्ञान का दर्शन होना चाहिये'।

'सर्वोदय' च्या पहिल्या अंकाला गांधीजींची ही प्रस्तावना! अहिंसा हा तपाचा आणि ज्ञानाचा विषय! पण इतरांनी आणि विशेषत: साधुसंतांनी प्रेममूलक अहिंसेचाही पुरस्कार केला आहे आणि त्याग ही प्रेमाचीच कसोटी आहे. प्रेम आणि सख्यत्व यांचा प्रकार एकच. आई अपत्यावर प्रेम करते म्हणून तिच्या मनात अपत्याबद्दल हिंसेची भावना उठूच शकत नाही. कुपुत्र असू शकतो पण कुमाता नसते, असे आद्य शंकराचार्यांनीच सांगून ठेवले आहे. प्रेम जेवढे मोठे तेवढा त्यागही मोठा आणि परिणती कशात? 'देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगाच्या तुटी। सर्व अर्पावे शेवटी। प्राण तोही वेचावा॥" म्हणजे सख्यत्वाची कसोटी प्राणार्पणानेच! नव्या पिढीने समर्थ रामदासांचे काही वाचले नसेल, पण "प्रीत बनी इस दुनिया में मर जाने के लिये।" हे गीत नक्कीच ऐकले असेल. प्रेममूलक मरणाची तयारी असली की युद्धाचे किंवा हिंसेचे कामच पडत नाही. दुसऱ्या महायुद्धाचे वेळी ब्रिटिशांनी आपली सगळी शस्त्रास्त्रे इंग्लिश खाडीत फेकून द्यावीत, असे म. गांधींनी जेव्हा सांगितले तेव्हा त्यांच्या मनात ही मानव प्रेमाचीच भावना प्रबळ होती.

'सर्वोदय' मासिक गांधी सेवा संघाच्या स्थापनेनंतर पंधरा वर्षांनी निघाले आणि त्या मासिकाने 'सर्वोदया'चे समग्र शास्त्र विशद केले. गांधी सेवा संघाची कल्पनाच

विलक्षण आहे. एखाद्या व्यक्तीसाठी जेव्हा एखादा संप्रदाय सुरू होतो त्यात व्यक्ति-पूजेचाच महिमा वाढतो. असे होऊ नये ही गांधीजींची तळमळ होती. ती त्यांच्याच शब्दात उद्धृत करणे बरे—

"आप मेरे नाम से इस तरह चिपटे रहेंगे तो दुनिया आपको हँसेगी। लेकिन एक दुसरा खतरा भी है। वह बडा भयंकर है। वह यह है कि आपका संघ कहीं एक संप्रदाय न बन जाय। मेरे जिन्दा रहते हुए भी, जब ऐसा हो सकता है, तो मेरे मरने के बाद क्या होगा? जब कोई कठिनाई सामने आएगी, तो आप कहेंगे, 'देखो उसने 'यंग इंडिया' और 'हरिजन' में क्या कहा है। आप अपनी आपस की बहस में कसम खा खा कर मेरे लेखों का प्रमाण देंगे। अच्छा तो यह है कि मेरी हड्डियों के साथ मेरे सारे लेख जला दिये जावें।"

"सेवा मंडळ", "संप्रदाय" या शब्दांना सांप्रदायिक आणि संकुचित अर्थ देऊन टाकल्यामुळे गांधी विचारांच्या आचरणासाठी हा "संघ" निर्माण झाला. 'गांधीवाद' अशी वस्तूच नाही, हे तर गांधीजी अखेरपर्यंत सांगत होते.

गांधी सेवा संघाची स्थापना झाली त्यावेळची स्थिती लक्षात घेण्यासारखी आहे. गांधी सेवा संघाचे अध्यक्ष श्री. किशोरीलाल मश्रूवाला यांनी ही हकीगत सांगितली आहे—

"संघ निर्माण झाला तेव्हा गांधीजी तुरुंगात होते. सहा वर्षाची शिक्षा त्यांना झाली होती. काँग्रेसमध्ये कौन्सिल आणि नाकौन्सिल असे दोन विचार निर्माण झाले होते. कौन्सिल प्रवेश अमान्य असणाऱ्यांना गांधीजींचे विचार शिरोधार्य वाटू लागले. रचनात्मक कार्यावर त्यांचा विश्वास होता आणि त्यावेळच्या काँग्रेसमध्ये रचनात्मक कामासाठी योग्य वातावरण नव्हते. अशा वेळी श्री. जमनालालजी, राजगोपालाचारीजी, वल्लभ भाई, राजेंद्र बाबू, गंगाधरराव देशपांडे आदी नेत्यांनी असा संघ तयार करण्याचा विचार केला. रचनात्मक कार्य करायचे आणि असहयोगी वकील, विद्यार्थी, सरकारी कर्मचारी इत्यादींना सेवाकार्यात सामील करून घ्यावयाचे". पुढे २८ नोव्हेंबर १९२७ ला तपोधन जाजूजी व पू. विनोबाजी यांना सामील करून ह्या संघाची कायदेशीर नोंद झाली.

१९२३ साली गांधी सेवा संघ स्थापन झाला तेव्हा त्याचे उद्देश—(१) म. गांधींनी मांडलेल्या सत्याग्रहाच्या सिद्धांताप्रमाणे जनतेची सेवा करणे, (२) या सेवा सिद्धीसाठी तत्कालीन प्रवृत्तींमध्ये खालील कार्यांचा समावेश असावा :—

खादी प्रचार, ग्राम सेवा, राष्ट्रीय शिक्षण, राष्ट्र भाषा प्रचार, मद्य आणि मादक पदार्थांचा सक्रिय निषेध, हरिजन सेवा, राष्ट्रीय एकता, स्त्री जाती सुधारणा, रोग निवारण आणि शुश्रूषा तसेच संकट निवारण, गोसेवा आणि गांधी साहित्य प्रचार.

संघ नोंदणीचे वेळी निर्वाह वेतनाचा क्रम सुरू झाला. हे निर्वाह वेतन १९३५ पर्यंत मासिक रु. ७५/-, त्यानंतर रु. १००/- ठरविले गेले. हा असंग्रहाचा विचार!

याशिवाय इतरही उद्देश होते. वरील उद्देश्य-संख्या अकरा होते आणि गांधीजींची व्रत-निश्चयाने उपासना करणारी व्रतेही अकराच होती. पुढे या प्रत्येक कार्यासाठी वेगवेगळया संस्था निर्माण झाल्या आणि त्यांचे कार्यक्षेत्र स्वतंत्र झाले. गांधी सेवा संघातील मंडळींनीच या जबाबदाऱ्या पुढे उचलल्या.

म. गांधीच्या हत्येनंतर पू. विनोबांनी सर्वांचा विचार घेऊन १९४८ साली सर्व सेवा संघाची स्थापना केली. एकादशव्रत साधनेसाठी इतर सर्व संस्था या संघात विलीन झाल्या.

(६) **महिलाश्रम : १९२४.**—म. गांधींच्या मनात स्त्री-पुरुष यांच्या संबंधी उच्च-कनिष्ठ असा भेदभाव कधीच नव्हता. पुरुषांना जे काय अधिकार असतील ते सर्व अधिकार स्त्रियांना असलेच पाहिजेत, हा त्यांचा कटाक्ष होता आणि तो कटाक्ष दक्षिण आफ्रिकेपासूनच ते पाळत आले होते. पुरुषाप्रमाणेच स्त्रीलाही ब्रह्मचर्याचा अधिकार म. गांधींनी दिला. पित्याचा हा वारसा पुत्र न उचलील तरच नवल ! स्त्री शिक्षणाची आस्था जमनालालजींना प्रथमपासूनच होती आणि स्त्रीने पुरुषा-बरोबर सर्व कामांत भाग घ्यावा अशा इच्छेने प्रेरित होऊन एखादी महिलांची संस्था स्थापन झाली तर बरे, असे जमनालालजींच्या मनात येताच एक सुयोग आला. स्व. सेठ सुरजमलजी रुईया यांना तीन मुली—शांतीबाई रानीवाला, रत्नीबाई कारुंडिया आणि मणिबाई मुरारका ! या तीन मुलींनी आपल्या स्त्रीधनातून पावणे तीन लक्ष रुपये देण्याचा संकल्प जमनालालजींजवळ बोलून दाखविला आणि या रकमेतून महिलाश्रमाची उभारणी होऊन शांतीबाई रानीवाला यांनाच जमनालाल-जींनी ह्या आश्रमात येऊन रहायला सुचविले.

महिलाश्रमाची ही इमारत बजाजवाडीच्या उत्तरेला आहे. या इमारतीत वरच्या मजल्यावर जे सभागृह आहे तेथे बरेच दिवस पू. विनोबांचे वास्तव्य होते. त्यांच्याच देखरेखीत महिलांची आश्रमशिक्षा सुरू झाली. या आश्रमाच्या जागेत आवश्यकते-प्रमाणे अनेक इमारती बांधल्या गेल्या. आश्रमाच्या मालकीच्या जागेतच पुढे 'काका-वाडी' म्हणून एक परिसर उभा झाला. राष्ट्रीय स्त्री-शिक्षणाचा शास्त्रशुद्ध पाया या संस्थेने घातला आणि एक आदर्श महिला संस्था निर्माण करण्याचे ध्येय आणि श्रेय या महिलाश्रमाला मिळाले. आरंभीची कार्यकर्त्यांची जी नावे आठवतात ती अशी—सर्वश्रीमती भागेरथी उपाध्याय, शांतीबाई रानीवाला, सर्वश्री नाना आठवले, श्रीधर हरी थत्ते, सौ. मालतीबाई थत्ते, कमलाबाई लेले, भवानीप्रसाद मिश्र, तिवारीजी, श्रीमती मीराबाई मुंदडा, कुळकर्णी असे अनेकानेक ! स्वातंत्र्य आंदोलनात वर्ध्याच्या अन्य आश्रमाप्रमाणे यांचाही वाटा मोठाच. स्त्रियाही पुरुषांबरोबर तुरुंगातील जाच, आच सोसू लागल्या ! ही दृष्टी, हे सर्वत्र भयवर्जन त्यांच्यात कुणामुळे आले ? सांगायला हवे ? या इमारतीच्या वरच्या प्रार्थना मंदिरात पू. विनोबांचे व पुढे म. गांधींचे काही काळ वास्तव्य होते ! गांधीजींचे लक्ष, विनोबाजींचे मार्गदर्शन, जमनालाल जींचा आटोप हा त्रिवेणी संगमच !

**(७) अखिल भारतीय चरखा संघ : १९२५.**——या संघाचे प्रथम कार्यालय अहमदाबाद येथे होते. पण म. गांधी १९३३ मध्ये वर्ध्याला बजाजवाडीत आले. अ. भा. चरखा संघाचे अध्यक्ष म. गांधीच होते. मंत्री शंकरलाल बँकर, जवाहरलाल नेहरू, कोषाध्यक्ष जमनालाल बजाज, सदस्य–मौ. शौकतअली, राजेंद्र प्रसाद, सतीशचंद्र दासगुप्ता, मगनलाल गांधी, ख्वा. कुरेशी. मागे एकदा आलेच आहे की, सामाजिक सुधारणेच्या चळवळीत जमनालालजींनी पुढाकार घेतला तो श्री. श्रीकृष्णदासजी जाजू यांच्या प्रेरणेने ! जाजूजींना राजकारणात रस नव्हता. तसे ते अखेरपर्यंत राजकारणापासून दूरच राहात गेले. पण जमनालालजींनी त्यांची गांधीजींशी भेट घडवून आणली आणि राजकारण नसले तरी रचनात्मक कार्यात जाजूजींनी आनंदाने सहकाराचे आश्वासन दिले. म. गांधींना योग्य कामासाठी योग्य माणसे हवी होतीच. त्यांनी जाजूजींना अ. भा. चरखा संघाचे मंत्रीच नेमून टाकले. खादीचे उत्पादन, खादीचा प्रचार, खादीचे शिक्षण, चरख्याचे संशोधन अशा एकूण मांत्रिक आणि तांत्रिक बाबतीत चरखा संघाची कामगिरी अतुलनीयच आहे.

गांधीजींच्या लेखी खादी म्हणजे केवळ हाताने कातलेल्या सुताचे, हातांनी विणलेले कापड ही कल्पना, मुळीच नव्हती. त्यांना 'खादी' हा मंत्र आणि तंत्र, शस्त्र आणि अस्त्रच वाटत होता. खादी म्हणजे कापड नव्हे ! एक जीवनदृष्टी, एक स्वतंत्र सांस्कृतिक पद्धती. याच रीतीने खादी समजून घ्यायला हवी. एखाद्या माणसाने खादी वापरली की तो सत्याग्रहाला लायक झाला, ही कल्पना म. गांधींना कधीच अभिप्रेत नव्हती. हिंदुस्थानात माजलेली भूक आणि कंगाली यावरचा हा इलाज होता. मानवाच्या प्राथमिक गरजा तीन——अन्न, वस्त्र, निवारा. अन्नासाठी ग्रामसेवा, कृषि उत्पादन, वस्त्रासाठी खादी आणि निवाऱ्यासाठी आश्रम, ही त्यांची उपाययोजना !

वर्ध्याला आल्यानंतर प्रथम मगनवाडीत खादी विद्यालय आणि प्रशिक्षणाचे कार्य सुरू झाले. उत्पादनाची सोय पाहून इतर गावीही खादी उत्पादन केंद्रे सुरू झाली. म. गांधींनी चरखा हा देशाच्या स्वातंत्र्याचे प्रतीकच मानला आणि काँग्रेसच्या झेंड्या-वर तीन रंगांच्या मधोमध चरख्याचे प्रतीक अंकित केले. भारताची वस्त्राची गरज ही सातत्याची गरज आहे. 'वासांसि जीर्णानि यथा विहाय' म्हणजे देहालाच वस्त्राची उपमा दिली. वस्त्र धुतले जाते, जीर्ण होते आणि नवे घ्यावे लागते. प्राथमिक गरजां-पैकी वस्त्राला सततची मागणी असणार. खादी हा त्यांचे दृष्टीने वादाचा विषय नव्हता, स्वादाचाही नव्हता. देशमुक्तीचा मंत्र म्हणून खादीकडे पाहिले तर ह्या एकाच साधनाने भारताच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटून जाईल, एवढा अढळ विश्वास त्यांना होता.

राऊंड टेबल कॉन्फरन्सच्या वेळी मँचेस्टरच्या कापड उद्योजकांनी म. गांधींना प्रश्न विचारले, तेव्हा शांत चित्ताने दिलेले उत्तर सर्वांनाच ठाऊक आहे.

आज देखील सेवाग्राम येथील चरखा संघातून खादीचे संशोधन कार्य चालूच आहे.

**(८) अ. भा. ग्रामोद्योग संघ : १९३४.**——गांधी सेवा संघाच्या कार्यक्रमातून अ. भा. ग्रामोद्योग संघाची स्थापना झाली आणि नालवाडी येथे या संघाने आपला संसार

थाटला. १९३३ मध्ये पू. विनोबाजी नालवाडी येथे राहायला गेले. १९३४ मध्ये मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनात निवडणुकीत भाग घेण्याचा ठराव जेव्हा पास झाला तेव्हा म. गांधींनी काँग्रेसचे 'चार आणे सदस्यत्व'ही सोडून दिले आणि आपले लक्ष सर्वस्वी रचनात्मक कार्याकडे लावले. अस्पृश्यता निवारण हरिजन सेवक संघाद्वारे व खादीचे काम अ. भा. चरखा संघाद्वारे चालू होते. खेडयापाडयात ग्रामीण उद्योग चालू झाले पाहिजेत त्याशिवाय गत्यंतर नाही, असे प्रतिपादन करून मुंबई काँग्रेसमध्ये त्यांनी ठराव आणला. ग्रामोद्योग संघात लक्ष घातले. श्री. श्रीकृष्णदासजी जाजू, अध्यक्ष आणि अर्थतज्ञ जे. सी. कुमारप्पा, महामंत्री नियुक्त झाले. ग्रामोद्योगाच्या संशोधनाचे कार्य मगनवाडीत सुरू झाले. आज या वास्तूमध्ये मगन संग्रहालय आहे. तेलघाणी, हाताने दळलेले पीठ, हाताने सडलेला तांदूळ, मधमाशा पाळणे इत्यादी संशोधन अ. भा. ग्रामोद्योग संघाचेच !

म. गांधी वर्ध्याला आल्यानंतर आणि रचनात्मक कार्यक्रमासाठी काँग्रेसचे सदस्यत्व सोडल्यानंतर त्यांनी आपल्या अकरा व्रतांच्या अनुषंगाने नव्या नव्या संस्था काढल्या. गांधीजींच्या व्रतांचा थोडा खुलासा केल्यानंतरच त्यांच्या उपस्थितीत अन्य संस्थांचा केवळ नामोल्लेख केल्यानेही काम भागेल, म्हणून हे थोडे विषयांतर !

गांधीजींची अकरा व्रते वर उद्धृत केली आहेत, त्यापैकी चार व्रते अकरणात्मक आहेत ती : (१) अहिंसा, (२) अस्तेय, (३) असंग्रह, (४) अस्वाद. श्रीमद्भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात दैवी गुण व आसुरी गुण विशद केले आहेत. दैवी गुणांची संख्या सव्वीस आणि आसुरी गुणांची संख्या केवळ सहा ! या सव्वीस गुणांमध्ये देखील सात गुण अकरणात्मक आहेत : (१) अभय, (२) अहिंसा, (३) अक्रोध, (४) अलोलुप्तत्वम्, (५) अचापलम्, (६) अद्रोह, (७) अपैशुनम्.

'अभय'च्या ऐवजी निर्भय असा शब्द योजणे शक्य नव्हते का ? नव्हते ! माणूस जन्माला येतो आणि त्याला जगायचे असते. जगत असताना भय वाटणारच ! म्हणून पू. विनोबांनी कमीत कमी भय म्हणजे अभय, हा अर्थ स्पष्ट केला आहे. त्याच रीतीने गांधीजींच्या अकरा व्रतांपैकी चार व्रते घ्यायची, जगण्यासाठी कराव्या लागणाऱ्या धडपडीत न-हिंसा अशक्य म्हणून अहिंसा !

आद्य शंकराचार्यांनी मंडनमिश्रांना 'स्तेनवत् भोक्ष्यसे कथम् ? ' असा प्रश्न विचारला होता. जो एकटा खातो तो चोर, संविभाग करून खातो तो सज्जन याच रीतीने असंग्रह आणि अस्वाद यांचा अर्थ लावणे बरे, माणसाला जीभ दिली आहे तर स्वाद, चव असणारच. तिला कमीत कमी करीत सूक्ष्मात नेणे म्हणजे अस्वाद ! चवेची गरजही आहे. " चवना " होऊ न देणे हे व्रत !

म. गांधींच्या अकरा व्रतांमध्ये 'शरीरश्रम' असे सहा क्रमांकाचे व्रत आहे. इंग्रजीमध्ये जेव्हा आपण डिग्निटी ऑफ लेबर म्हणतो, तेव्हा बरे वाटते. पण श्रमाला प्रतिष्ठा देणे जिवावर येते. श्रमप्रतिष्ठा म्हणजे काय ? जी कामे इतरांना करण्याची घाण वाटते, लाज वाटते म्हणून ती कामे स्वतः गांधींनी केली आणि आपल्या माणसांना करायला लावली. उदाहरणार्थ, भंग्यांचे काम, वर्ध्याला आल्याबरोबर त्यांनी

पहिले काम हेच केले. शुद्ध साधन हाती आल्यानंतर स्वातंत्र्याचे स्वप्न पाहणारे म. गांधी फार दूरवर विचार करीत. व्यक्तिगत आणि समूहगत काही कामे अशी असतात की ज्यामुळे सुख, आनंद वाटतो. उदाहरणार्थ, खाणे-पिणे ! पण काही कामे अप्रिय असतात आणि व्यक्तीला करावे लागले तर त्याला कर्तव्य म्हणतात. उदाहरणार्थ, भांडी घासणे, तोंड धुणे इत्यादी. भारतीय समाजावर धर्माने, सत्तेने, द्रव्याने अशीच अप्रिय कामे लादली गेली. स्वातंत्र्यानंतर देशातील लोकांनी ती कामे करायचे नाकारले तर ?

म्हणूनच श्रमाची प्रतिष्ठा त्यांना वाढवायची होती आणि गीतेतील 'यद् यद् आचरति श्रेष्ठ:' ही प्रथा रुळवायची होती.

जातिभेद, वर्णभेद हा फार जुना आहे आणि समाजात मान्यता पावलेला आहे. राजे लोकांना किंवा श्रीमंत लोकांना त्यांच्या अंगात कपडे (अर्थात त्यांचेच) चढवायला नोकर लागायचे. ते धुवायला नोकर लागायचे. तुलसीरामायणामध्ये तुलसीदासांनी प्रभू रामचंद्राबरोबर सीतामाई वनवासात जायला निघाल्या तो प्रसंग सोप्या भाषेत वर्णिलेला आहे. पण आजच्या विचाराला तो चालना देऊन जातो, एवढे मात्र खरे. सीतामाई पतीबरोबर जायला निघाल्या. कौसल्या आणि सुमित्रा यांची मने कासावीस झाली. सीतेला वनवासातले कष्ट सोसवणार नाहीत. कारण तिला सर्वांनी जपत जपत सांभाळले आहे. "जीवनमूरिजिमि जुगवतरहही, दीपबत्ती नहीं टारन कहही" सीतेचा संभाळ असा झाला होता. तिला कोणी दिव्याची वात सारायचेही कष्ट दिले नव्हते. म्हणजे हे काम दासीचे ! हा वर्णभेद, श्रमभेद स्त्रिया आणि दास-नोकर यांना शेकडो वर्षांपासून भोवत होता. भावत मात्र मुळीच नव्हता !

सत्ता, मत्ता, धर्म यांनी केलेला हा वर्गभेद म. गांधींना समूळ नाहीसा करायचा होता. त्यांच्या अकरा व्रतांत शरीरश्रम अंतर्भूत झाले ते या अर्थाने !

'सर्वोदय' शब्द म. गांधींचा. कधी कधी 'अंत्योदय' अपरिहार्यच आहे, असे ते म्हणायचे. सर्वोदय म्हणजे सर्वांचा उदय. षष्ठीतत्पुरुष समास म्हणून सोपा वाटतो. पण त्यामागील भूमिका अंत्योदयाचीच आहे. पश्चिमेकडला राजकारणाचा विचार 'ग्रेटेस्ट गुड ऑफ दि ग्रेटेस्ट नंबर' जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत जास्त भले ! म्हणजे शंभर लोकांमध्ये नव्याण्णव लोकांचे भले होणार असेल तर तो पश्चिमी राजकारणाचा अखेरचा शब्द !

म. गांधींच्या मनात नव्याण्णव लोकांचा विचार आला नाही. विचार आला तो उरलेल्या एकाचा. या एका बिचाऱ्याला इतरांच्या भल्यासाठी बळी जाण्याशिवाय उपायच नाही काय ? अंतिमाचा उदय हा हक्क म्हणून गांधींनी मान्य केला आणि निरपवाद रीतीने सर्वोदय=सर्वांचा उदय, असा शब्द प्रचारात आणला. अहिंसेच्या मार्गाने हे आणि हेच शक्य होते.

त्यांच्या देखरेखीखाली निघालेल्या पुढील संस्था त्यांच्या व्रतांनुसार आहेत की नाहीत, हे स्वत: जातीने ते बघत.

(९) महारोगी सेवा मंडळ : १९३६.—सेवाशुश्रूषा हे गांधीजींचे व्रतच होते. हे व्रत पुढे चालविण्यासाठी एक विलक्षण व्यक्तिमत्त्व पुढे आले. ते म्हणजे श्री. मनोहरजी दिवाण. त्यांचे अध्ययन पू. विनोबाजींकडेच झाले होते. ब्रह्मचर्याचे व्रत त्यांनी घेतले होते. वृत्ती आणि कृती दोन्ही 'नम्रत्वे' च! "ज्ञानाची चाळीशी गाठली की न दिसणारे 'अक्षर' दिसू लागते." हा अनुभव त्यांचाच! त्यांनी महारोग्यांची सेवा पत्करली. संस्था काढावयाची असे ठरल्याबरोबर जमनालालजींनी देवस्थान ट्रस्टची दत्तपूरला असलेली शंभर-दीडशे एकर जमीन दर एकरी शंभर रुपये या भावाने या मंडळाला विकली. कार्याची जबाबदारी श्री. मनोहरजी दिवाण यांनी उचलून सेवाकार्य सुरू केले. या संस्थेच्या शाखा येळीकेळी, वायगाव, देवळी, खरांगणा, सेलू, सिंदी येथे सुरू झाल्या. आज आंतरराष्ट्रीय ख्यातिप्राप्त श्री. बाबा आमटे हे महारोग्यांवर प्रथम उपचार येथूनच शिकले. १९४० मध्ये या संस्थेचे 'कुष्टधाम दत्तपूर' असे नामाभिधान झाले. शेती, बागवानी, गोशाळा, खादी, चर्मवस्तू असे उद्योग येथे सुरू झाले. महारोग्यांच्या कष्टातून सुमारे ४०० एकर जमीन धान्य-फळे पिकवू लागली आणि उत्पन्नाचा आकडा ६ लाखांपर्यंत पोहोचला.

मनोहरजींबरोबर डॉ. रविशंकर शर्मा, डॉ. जगन्नाथ महोदय यांचाही उपचार कार्यात सहभाग उल्लेखनीय आहे. १९४२ ची चळवळ थांबल्यावर १९४४ मध्ये म. गांधी सेवाग्रामला आले तेव्हा त्यांनी कुष्टधाम दत्तपूरला भेट दिली. "मेरे लिये यह तो यात्रा का स्थान है" हे म. गांधींचे तृप्तीचे उद्‌गार!

मनोहरजींना १९५७ मध्ये सरकारने 'पद्मश्री' किताब दिला. मनोहरजी त्यानंतर पू. विनोबाजींकडे परंधाम आश्रमात व्यवस्थापक म्हणून राहायला गेले. १५ जानेवारी १९८० मध्ये त्यांचे देहावसान झाल्यानंतर कुष्टधाम दत्तपूरचे 'मनोहर आरोग्य निकेतन' असे नामाभिधान झाले.

(१०) राष्ट्रभाषा प्रचार समिती : १९३७.—९ जुलै १९३७ मध्ये सेवाग्राम येथे राष्ट्रभाषेसंबंधी एक सभा होऊन अखिल भारतीय राष्ट्रभाषा प्रचार समितीची शाखा वर्ध्याला काढायचे ठरले. कानपूर निवासी सेठ पद्मपदजी सिंघानिया यांनी दरवर्षी १५ हजार याप्रमाणे पाच वर्षांत ७५ हजार रुपयांची देणगी राष्ट्रभाषा प्रचारासाठी जाहीर केली. आरंभी अेम. सत्यनारायणजी हे मंत्री झाले. १९३८ मध्ये मंत्रिपद श्रीमन्नारायण यांनी सांभाळले. १९४२ मध्ये भदन्त आनंद कौसल्यायन यांनी हे पद सांभाळले. पुढे मोहनलाल भट्ट यांची नियुक्ती झाली आणि सध्या श्री. शंकररावजी लोंढे हे काम सांभाळीत आहेत.

राष्ट्रभाषा प्रचार समितीचा व्याप आता प्रचंडच झाला आहे आणि वर्धा स्टेशनला लागूनच प्रचार सभेची डोळ्यात भरण्याजोगी वास्तू आज कार्यरत आहे.

(११) मातृ सेवा संघ : १९३७.—सन १९२१ मध्ये श्रीमती कमलाताई हॉस्पेट या मायमाऊलीने सूतिकागृहाच्या कार्यात स्वतःला वाहून घेतले. या कार्यातून 'मातृ सेवा संघ' ही संस्था नागपूरला अस्तित्वात आली. कमलाताईंची तळमळ, कार्यकुशलता आणि संघटन शक्ती अद्‌भूतच! प्राक्तनदोषामुळे त्यांना मातृत्व लाभले नाही. पण

या दोघांचे उन्नयन करून 'हजारो मातांची माता' आणि 'हजारो बालकांची आजी' होण्याचे स्वप्न त्यांनी आकाराला आणले आणि तारुण्याला लाजवील अशा डीड धने त्या कामाला लागल्या. गावोगावी सूतिकागृहाच्या शाखा काढण्याचा उद्यम सुरू केला.

अशा या सत्कार्याकडे जमनालालजींचे लक्ष न जाते तरच नवल! त्यांनी पुढाकार घेतला आणि मातृ सेवा संघाची शाखा वर्ध्याला निघावी या उद्देशाने नव्या इमारतीसाठी जमनालालजींनी दहा हजार रुपये दिले. श्रीमती कृष्णाताई भावे तत्पर होत्याच. श्री. द्वारकानाथजी लेले यांच्या त्या भगिनी. लेलेजी पू. विनोबांबरोबरच वर्ध्याला आले होते. कृष्णाताईंनी पुढाकार घेतला. सर्वश्री काकासाहेब परांजपे, अत्रे वकील, आगाशे वकील, डॉ. बापट, कावळे वकील, डॉ. मनुभाई त्रिवेदी, डॉ. सौ. शांताबाई बापट, डॉ. वनिता चोरघडे, तनुबेन त्रिवेदी, सौ. कमलाबाई लेले या मंडळींनी वर्ध्याला ही संस्था मनाच्या लागणीने आकाराला आणली. आणि मातृ सेवा संघाचे वर्ध्याचे कार्य भव्य, स्वतंत्र इमारतीत नागपूरच्या खालोखाल सुचारू रूपाने चालू झाले—चालू आहे. मातृभावनेच्या शोभेची लकाकी वर्ध्यावर शोभू लागली. वर्धा या गावाचे नाव स्त्रीलिंगी का, हे कोडेच आहे. बऱ्याच गावची नावे नपुंसकलिंगी असतात.

(१२) **नई तालीम : १९३७.**—मूळ कल्पना म. गांधींचीच. शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार तर झालाच पाहिजे आणि शिक्षण सार्वजनिक होण्यासाठी स्वावलंबनाचे तत्त्व त्यात आले पाहिजे. खेड्यापाड्यांत गरिबांची मुले पाच-सहा वर्षांपासूनच परिस्थितीमुळे राबायला लागतात आणि आई-बापाच्या कमाईच्या पिठात स्वकमाईने मीठ घालतात. शिक्षण सक्तीचे केल्यानंतर आई-बाप मुलांना नुसतेच शिकण्यासाठी शाळेत घालायला तयार नसतात. कारण शिक्षण मोफत असले तरी मुलाकडची मीठ कमाई बंद होते.

१९३७–३८ मध्ये श्री. श्रीमन्नारायण यांच्या पुढाकाराने सुविख्यात शिक्षणतज्ज्ञ के. जी. सय्यदिन यांच्या अध्यक्षतेखाली एक परिषद वर्ध्याला झाली. म. गांधींनी दोन कल्पना मांडल्या : (१) मूलभूत शिक्षण एखाद्या धंद्याशी, उद्योगाशी जोडले जावे (हे रशियात केले गेले आहे.) आणि (२) ह्या धंदेशिक्षणातून शिक्षकाचे वेतन दिले जावे. म्हणजे प्रोजेक्ट मेथडच्या भातुकलीतून सुटून विद्यार्थी जी वस्तू निर्माण करतील ती वस्तू बाजारात भाव खेचू शकेल. या दोन कल्पना प्रत्यक्षात आणण्यासाठी नई तालीम संस्थेची स्थापना होऊन श्री. ई. डब्ल्यु. आर्यनायकम् आणि त्यांच्या पत्नी श्रीमती आशादेवी आर्यनायकम् यांनी सर्व जबाबदारी स्वीकारली. सध्या ही संस्था सेवाग्रामला कार्य करीत आहे.

(१३) **मगन संग्रहालय (१३–१२–१९३८).**—म. गांधींनी ग्रामोद्योग संघाच्या विकासासाठी जी सल्लागार समिती नियुक्त केली होती, त्यात सर्वश्री रवीन्द्रनाथ ठाकूर, सर जगदीशचंद्र बोस, सर पी. सी. रे, डॉ. सी. व्ही. रमण, डॉ. बी. सी. रॉय, डॉ. अन्सारी, जिवराज मेहता, घनश्यामदास बिरला ही मंडळी होती. 'ग्रामोद्योगा'च्या विकासासाठी अशा संग्रहालयाची गरज निश्चित होऊन मगनवाडीमध्येच मगनलाल संग्रहालयाचे उद्‌घाटन म. गांधींच्या हस्ते ३० डिसेंबर १९३८ मध्ये झाले. डॉ. कुमारप्पा कारभार पाहू लागले. या संग्रहालयाजवळ त्यांचेसाठी एक कुटी उभारण्यात आली. पुढे डॉ. कुमारप्पांनी सेलडोह येथे स्वतंत्र कार्य सुरू केले.

ग्रामोद्योगी वस्तूंचे एक उत्तम संग्रहालय म्हणून आजही हे प्रदर्शन आपली जबाबदारी पार पाडीत आहे.

(१४) **हिंदुस्तानी प्रचार सभा: १९४१.**—महिलाश्रमाच्या जमिनीवरच सेवाग्राम रस्ता सुरू होतो. तिथेच 'काकावाडी' अस्तित्वात आली. ग्रंथालय, इमारत आणि कार्यकर्त्यांची निवासस्थाने मिळून दहा-पाच इमारतींचा संच उभा झाला. आचार्य काका कालेलकर यांच्यावर ह्या सभेची जबाबदारी सोपविली. काकासाहेबांचे साहित्यातील स्थान श्रेष्ठ! गुजरातची त्यावेळची साहित्यिकांची पिढी काकासाहेबांजवळ शिकली. राष्ट्र भाषा प्रचार सभा ही हिंदीचा प्रचार करीत होती. हिंदी व्यतिरिक्त इतर भाषेतलेही शब्द घेऊन हिंदुस्थानी भाषा तयार करण्याचे कार्य सुरू झाले.

एक सार्वभाषिक वर्ग कोश काढण्याचा संकल्प डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखाली पूर्ण करण्याचे ठरले. भारतातील १४ प्रचलित भाषा आणि बोली लक्षात घेऊन देवनागरी लिपीत मूळ शब्द घेऊन त्याला प्रतिशब्द इतर भाषांत योजण्याची ही कल्पना होती. मूलभूत 'कल्पना' निवडीचे कामही सुरू झाले. पण १९४२ च्या आंदोलनात हे कार्य तसेच राहिले. काही दिवस हिंदुस्तानीचा प्रचार करायला 'सबकी बोली' नावाचे एक सुन्दर मासिक काका कालेलकर आणि श्री. श्रीमन्नारायण यांच्या संपादकत्वाखाली निघत होते.

सध्या ही वास्तू महिलाश्रमाच्या ताब्यात आहे.

इथवर वर्धा परिसरातील एक संस्था सोडून अन्य संस्थांचा परिचय-परामर्श घेतला. यानंतर तीन संस्था वर्ध्याबाहेरच्या म्हणून स्वतंत्र परामर्श घेणे बरे. वर्ध्यातील एक चिरस्मरणीय संस्था—बजाजवाडी—तिचा परामर्श स्वतंत्र प्रकरणात घ्यायचा आहे.

(१५) **सेवाग्राम.**—महात्मा गांधी वर्ध्याला आल्यानंतर काही दिवस महिलाश्रमात आणि मगनवाडीत वास्तव्यास राहिले. जमनालालजींनी त्यांना त्यांचा आश्रम सोडून वर्ध्याला मुद्दाम आमंत्रण दिले होते. सरदार वल्लभभाईंना अर्थात हे पसंत नव्हते. जमनालालजींनी आपली एक बाग महात्मा गांधींच्या आश्रमाला द्यायचे ठरविले होते. "सरदार अशा दहा बागा देऊ शकले असते. पण जमनालाल देऊ शकले नसते", हे महात्मा गांधींचेच उद्गार!

जमनालालजींनी, त्यांच्या मालगुजारीतले वर्ध्यापासून थोड्या अंतरावर शेगाव नावाचे गाव होते, तिथेच आश्रमाची वास्तू उभी करण्याचा संकल्प केला आणि १९३६ मध्ये सेवाग्राम आश्रम पूर्ण होऊन म. गांधी तिकडे रहायला गेले. अकोल्याजवळील मोठे स्टेशन शेगाव याची गल्लत होऊ नये म्हणून हे छोटे शेगाव बदलून 'सेवाग्राम' असे नाव देण्यात आले. सेवाग्रामचा पसारा इतका वाढला की, तेथे सरकारला स्वतंत्र डाकघर उघडावे लागले. अ. भा. चरखा संघ, खादी विद्यालय, तालिमी संघ, कस्तुरबा हॉस्पिटल आणि इतर अनेक तत्सम संस्था सेवाग्रामलाच गेल्या. देशातील स्वातंत्र्योन्मुख सर्व संस्था आणि मान्यवर पुढाऱ्यांचे केंद्रस्थान म्हणून सेवाग्रामची सर्वत्र ख्याती झाली. गांधींच्या सल्ल्याशिवाय पानही हलायचे नाही, अशी कॉंग्रेसची स्थिती होती.

लोकप्रमुख, लोकनेते आणि सरकारप्रमुख सर्वच मंडळी गांधींना भेटायला येऊ लागल्यामुळे सेवाग्राम आश्रम म्हणजे एक स्वावलंबी गावच होऊन बसले. काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सर्व सभा वर्ध्याला बजाजवाडीतच होत असत. त्या कार्याचा उहापोह अन्यत्र!

२५ ऑगस्ट १९४६ ला गांधीजी दिल्लीला गेले. १ फेब्रुवारी १९४८ ला सेवाग्रामला ते परत यायचे होते. पण ३० जानेवारी १९४८ हा त्यांच्या जीवनातला अखेरचा दिवस ठरल्यामुळे ते परत आले नाहीत. सेवाग्रामचा इतिहास स्वतंत्र उपलब्ध आहे.

डॉ. सुशीला नायर यांच्या प्रयत्नातून व प्रमुखत्वातून आज सेवाग्रामला कस्तुरबा हेल्थ सोसायटीतर्फे महात्मा गांधी इन्स्टिटयूट ऑफ मेडिकल कॉलेज उभे असून, वर्ध्याइतकीच गजबज सेवाग्रामला सुरू आहे.

(१६) नालवाडी—गोपुरी (१९३४).—वर्ध्याहून नागपूरला यायला निघाले की, वर्ध्यापासून सुमारे तीन कि. मी. अंतरावर नालवाडी हे गाव लागते. या गावाला गरीब आणि दलितांची वस्ती अधिक त्यामुळे गांधीनिष्ठ सेवकांचे हे आकर्षण स्थान. वर्धा सोडल्यानंतर पू. विनोबाजींचा मुक्काम जवळजवळ सात वर्षे नालवाडीला होता. जमनालालजी यांनी विनोबांना गुरुस्थानी मानले होते. ते जिथे असतील, जातील, ते ठिकाण त्यांच्या दृष्टीने उत्तमच होते. "जैसा देव पुजोनि पाहिजे पेरूनि घेता जाइजे" या तऱ्हेचे हे संबंध ! विनोबाजींजवळ विश्वासू कार्यकर्त्यांचा फार मोठा ठेवा होता. 'मी' कार्याला लागलो, तर 'आम्ही' कार्याला लागूच, ही पू. विनोबांची वागण्याची तऱ्हा. सर्वश्री गोपाळराव वाळुंजकर, मनोहर दिवाण, दत्तोबा दास्ताने, गोपाळराव काळे, कुंदर दिवाण, भाऊ पानसे, बाबाजी मोघे आदी अथक कार्यशक्ती असलेली माणसे. खादीचे काम नालवाडीला उत्तम होऊ लागले आणि नालवाडीची गोपुरी झाली.

श्री. गोपाळराव वाळुंजकर यांचे नाव निघाले म्हणून एका अभिनव प्रवृत्तीचा उल्लेख करणे अवश्य आहे. जे काम अत्यंत हीन म्हणून समजले जाई, तेच काम म. गांधी, पू. विनोबा आणि त्यांचे सहाय्यक यांना प्रिय असे. भंगीकामाचे स्पष्टीकरण आलेच आहे. श्री. गोपाळरावजींनी असेच एक हेय, हलके काम स्वीकारण्याचे धैर्य तर दाखविलेच पण त्यातले उत्तम कसबही मनापासून कमाविले. श्री. गोपाळरावजी जातीने ब्राह्मण, देशस्थ, ऋग्वेदी शिवाय पदवीधर, एम. ए. पर्यंत शिकलेले. त्यांनी काम पसंत केले ते मेलेल्या गुरांची चामडी काढणे, ती कमाविणे आणि त्याच्या उत्तम उपयुक्त वस्तू बनविणे.

हे कार्य हलक्या, अस्पृश्य जातीचे, तेही त्यांनी नाईलाजाने पत्करलेले, अर्थशास्त्रात नॉन कॉंपिटिंग ग्रुप्स म्हणून ज्याचा उदो-उदो केला जातो, तीच या गुरे फाडणाऱ्या लोकांवर धर्म, सत्ता आणि मत्ता यांनी पाळी आणली होती. हेच काम तुम्हाला विहित आहे, करा नाही तर, उपाशी मरा. दुसऱ्या कामाचा निषेध ! जिवंत गुरे मारून त्यांची कातडी कमावण्याचे काम महात्मा गांधींच्या अहिंसेत बसूच शकत नव्हते. श्री. गोपाळरावजींनी हे काम स्वीकारले. उच्च वर्ण आणि पदवीधराने हे काम स्वीकारणे म्हणजे कामाला प्रतिष्ठा आलीच. कोणत्याही

कामात श्रेय आणि प्रेय बघणारे महात्मा गांधी प्रतिष्ठाभंजनाच्या मागे किती कसोशीने लागले होते, याचे हे एक उदाहरण !

या चर्मालयात ज्या वस्तू होत, त्याला अहिंसक वस्तू म्हणत. डॉ. राजेंद्र प्रसाद, खुद्द महात्मा गांधी इथून तयार झालेली पायताणे वापरीत असत. म्हणजे या कामाला श्रेष्ठता आली. खादी ग्रामोद्योग कमिशनच्या अंतर्गत हे काम अजून चालू आहे. जीवनमूल्ये बदलवून टाकण्याचे श्रेय श्री. गोपाळरावजी वाळुंजकर यांना देण्यात नम्रताच आहे !

(१७) **परंधाम आश्रम; ब्रह्मविद्या मंदिर, पवनार.**—ही एक अभिनव संस्था, हिची स्थिती-गती समजावून घ्यायला जी शक्ती लागते, ती आणणार कुठून ?

**सकळकर्ता तो ईश्वरू । तेणे केला अंगिकारू ।**
**तया पुरुषाचा विचारू । विरळा जाणे ।।**

**(दासबोध, दशकाद, समास ६)**

समर्थ रामदासांनी 'तया पुरुषाचा विचारु विरळा जाणे' असे नमूदच करून ठेवलेले आहे. पवनारच्या प्रवृत्ती ह्या खास पूज्य विनोबांच्या प्रवृत्ती. पूज्य विनोबा ब्रह्मज्ञान व ब्रह्मविद्येचे उपासक, ज्ञाते आणि तदनुषंगाने सर्वच काही ! विनोबांच्या जीवनभराच्या साधनेचा केंद्र बिंदू म्हणजे ब्रह्मविद्या ! तिच्यासाठी त्यांनी घर सोडले. त्यासाठीच ते पूज्य बापूंजवळ आले आणि ब्रह्मविद्येच्या प्रयोगाने उत्साहित होऊन त्यांनी 'चराति चरतो भग: ' हे व्रत घेऊन अखिल भारताची भूदान यात्रा संपन्न केली. त्यांचे हे भारत-दर्शन जगातील सत्-प्रयोगाचा अद्‌भुत चमत्कारच !

१९३८ पासूनच पवनार ही त्यांनी आपली साधनाभूमि ठरवून ठेवली होती की काय, कोण जाणे ! धाम नदीच्या तीराचे त्यांना का आकर्षण वाटले ? पूर्वीचे प्रवरपूर हे आजचे पवनार. प्रवरपूरच्या राजाचे नाव प्रवरसेन. प्रवरसेनाची आई रामभक्त, तिने नित्य दर्शनासाठी रामाचे मंदिर बांधले. काळाने ही मंदिरे उद्‌ध्वस्त केली. विनोबाजींनी तिथे 'राम-भरत भेट' अशी एक मूर्ती शोधून काढली. हा ईश्वराचा प्रसाद समजून या मूर्तीची प्रतिष्ठापना केली आणि दैवी बंधुभावनेचा महिमा शिकविण्यासाठी आपले संन्यासाश्रमाचे चंबूगबाळे पवनारला ठेवले. 'वर्षिये नाही सांडिली । ग्रीष्मे नाही मंडिली ' अशी बारमाही धाम नदी—तिथे एका टेकडीवर जमनालालजींनी एक लाल बंगला बांधला होता, तोच परिसर आता 'ब्रह्मविद्येचा आगरु' बनून गेला.

कांचनमुक्तीचे प्रयोग, ऋषी-शेतीचे प्रयोग, याच वास्तूत सुरू झाले. पुरुष अविरोधी ब्रह्मवादिनींचा संच भारताच्या प्रांताप्रांतातून तेथे गोळा झाला. श्रम-प्रतिष्ठा, असंग्रह आणि स्वत:च्या परिश्रमाने कमावलेले अन्न ही साधना या ब्रह्मवादिनींसाठी निहित करून विनोबांचे वेदान्त शिक्षण येथे सुरू झाले. अंत्योदय, सर्वोदय आणि त्याच्या पुढे आत्मोदय ही पूज्य विनोबांची साधना-श्रेणी ! तिचे वर्णन करायला अपुऱ्या बुद्धीतून शब्द आणायचे कुठून ? प्रयोग डोळ्यांनी पाहिले तरी ते आत-आत संवेद्य व्हायला योग्यता आणायची कुठून ? अधिकारी समर्थांचेच शब्द वापरावेत आणि नमस्कार करावा.

देव पहावया कारणे । देऊळ लागती पाहाणें ।
कोठेंतरी देउळाच्या गुणे । देव प्रगटे ।। १२ ।।
देउळे म्हणिजे नाना शरीरे । तेथे राहिजे जीवेश्वरे ।
नाना शरीरे नाना प्रकारे । अनंत भेदे ।। १३ ।।
चालती बोलती देउळे । त्यामध्ये राहिजे राउळे ।
जितुकी देउळे तितुकी सकळे । कळली पाहिजे ।। १४ ।।

(दासबोध : दशक १७, समास १)

मोठे मोठे येऊन गेले । आत्म्याकरिताची वर्तले ।
त्या आत्म्याचा महिमा बोले । ऐसा कवणू ।। ११ ।।
युगानयुगे येकटा येक । चालवितो तिनी लोक ।
त्या आत्म्याचा विवेक । पाहिलाच पहावा ।। १२ ।।
प्राणी आले येऊन गेले । ते जैसे तैसे वर्तले ।
ते वर्तणुकेचे कथन केले । इच्छे सारिखे ।। १३ ।।

(दासबोध : दशक १७, समास ३)

आजवर आत्मविद्या, ब्रह्मविद्या यांचे प्रयोग व्यक्तिगत 'निहितं गुहायाम्' असे झाले. पूज्य विनोबांनी ब्रह्मविद्येचा प्रयोग सामूहिक केला. विहीर खणताना, विहिरीचे पाणी बागेला देताना, गायी-वासरांचे शेणसूत वारताना, स्वयंपाक करताना, भाजी चिरतानाही ब्रह्मविद्येचे रहस्य इथल्या भागवती ब्रह्मवादिनींना त्यांनी उलगडून दाखविले आणि स्वतः मात्र अलिप्त राहिले—–ही देखील ब्रह्मविद्याच !

या आश्रमाला शासन नाही, व्यवस्थापन नाही. ईश्वरा, अन्नही तूच आहेस आणि अन्न खाणाराही तूच आहेस. कारण सर्वांमध्ये तू, तू आणि तूच आहेस.

"ते बकरे जिवंत असताना 'में में में' करीत असते. 'मी मी मी' म्हणत असते. परंतु ते मरून त्याची तांत पिंजणाला लावली की ताडू म्हणतो 'तुही, तुही, तुही–तूच तूच–तूच' असे ते म्हणते. आता सारे तुही तुही–तुही तुही ! "

वर्ध्याच्या अध्यात्म विकासासाठी म. गांधींच्या प्रेरणेने जे प्रयत्न झाले, ज्या संस्था उभ्या झाल्या त्या संस्थांच्या अल्प परिचयातूनही एक अनुस्यूत सूत्र लक्षात येते. ते म्हणजे या सगळ्या संस्थांत जमनालालजींचा उपक्रम ठळक लक्षात येतो. मोठे शब्द वापरू नयेत, हे खरे, पण महाभारताची आठवण येते, त्याला करावयाचे काय? संपूर्ण महाभारताचा अभ्यास घडलेला नाही! पण माता-पित्याच्या स्नेहल शब्दांतून हा भारताचा इतिहास मनात ठसून गेला. महाभारताचा नायक कोण? याचे उत्तर श्रीकृष्ण, असे मिळते. त्याच्या ज्ञानयोगव्यवस्थितीतूनच हा महान इतिहास घडला. श्रीकृष्ण साक्षात् ईश्वराचा अवतार! शक्याशक्यतेचा विचार करटाच! महाभारताची कथा देशोदेशी परिचित आहे. ज्या देशात ते घडले, तेथे जर ठाऊक नसेल, तर तो दोष महाभारताचा नाही.

महान ग्रंथामध्ये नेहमी एक मंगलमूर्ती पात्र असते, सबंध ग्रंथ त्याच्या छायेत, सावलीत, वावरतो, पूर्ण होतो. व्हिक्टर ह्युगोच्या " ला मिझराब्ल " या कादंबरीत ' बिशप ' चे पात्र हे मंगलमूर्ती पात्र आहे. ' ला मिझराब्ल ' चा नायक हा बिशप नव्हे.

महाभारतातील मंगलमूर्ती पात्र म्हणजे पितामह भीष्म! आरंभापासून अखेरपर्यंत महाभारत त्यांच्या सावलीत रचिले गेले आहे.

वर्ध्याच्या अभूतपूर्व विकासाच्या इतिहासात मंगलमूर्ती पात्राचा शोध घेतला तर छाया-सावली जमनालालजींचीच, असे म्हणावे लागेल.

**म. गांधी, पू. विनोबा, उज्ज्वल जमनालालजी !**

**नमस्तस्मै नमस्तस्मै नमस्तस्मै नमोनम: ।**

---

# ' मुद्रा भद्राय राजते '

' अस्तिउत्तरस्यां दिशि ' अशी सुरुवात करावी, असे मनात होते. पण ' भान येता ' बहु लाजलो! कारण एका महाकवीने आपल्या एका महाकाव्याची सुरुवात याच काव्यपंक्तीने केली आहे.

––आणि दिशादिशांचे भान होते कोणाला? सूर्य उगवतो ती पूर्व, सूर्य मावळतो ती पश्चिम–एवढीच सवय होती. उत्तर दिशा ध्रुवाची आणि दक्षिण दिशा यमाची, असे आई सांगायची. दक्षिण दिशेला पाय करून झोपायचे नाही, हा जननीचा आदेश. ' कोटिच्या कोटि उड्डाणे झेपावे उत्तरेकडे ' यातील हनुमंताची उत्तर दिशा कोणती ? ' पक्षी जाती दिगंतरा ' म्हणजे काय ? प्रश्नच प्रश्न !

पण इतक्यातच एका कवीची काव्यपंक्ती आठवली ––

**" वृंदावनि तुज भेटेल माधव सरळ नीट जा या वाटेने**
**दिसतिल तुज हरिचरण उमटले यमुनेच्या काठाकाठाने "**

यमुनेच्या काठी अजूनही हरिचरण उमटलेले दिसतील काय? जे उमटते ते पुसले जाते. कुणी एक माणूस समुद्राच्या क्लिन्न पुलिनावर बसला होता. अहोटीमुळे समुद्रसिकता सपाट, मऊ मऊ झाली होती. त्या माणसाने तिथल्या वाळूवर आपल्या बोटाने आपले नाव लिहिले. इतक्यात समुद्राची लाट आली आणि ' अब्धीच्या अदय ' लीलेने ते नाव पुसले गेले. ते जर खरे तर भवभूतीचा आशावाद "कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वि:" हा खोटाच मानायचा काय ?

काही कळत नाही बघा, सुचतही नाही !

एक कहाणी सांगायची आहे.

कहाणी ऐका कहाणी, कहाणी कोणाची? कहाणी धरित्रीची, कहाणी जळाची, कहाणी दिव्याची, कहाणी वाऱ्याची, कहाणी आकाशाची !

एक मात्र निश्चित जाणा, येथे उमटल्या पाऊलखुणा ! पाऊलखुणा कशा? सोन्याने मढवलेल्या हिऱ्यांच्या जशा !! पाउले कुणाची? धरतीवरचे दाणे टिपायला खाली उतरलेल्या चिमण्या–साळुंक्यांची ! कहाणी झाडांची, झाडपाल्याची, पाचोळ्याची !

एक क्षेत्र बजाजवाडी, तिथे जमली हजार जोडी. उद्देश एक, पाउले अनेक !

वर्ध्याच्या रेल्वे स्टेशनवर उतरायचे. कचेरीच्या रस्त्याने लागायचे. टपाल खात्याची इमारत आली की डावी सोडून उजवी घ्यायची. रस्ता साधा आहे. वळण सीधे आहे. वळण घेतले की बजाजवाडी. या वाडीचे क्षेत्रफळ–क्षेत्राचे. अधिक उणेपण क्षेत्रशास्त्राच्या हिशेबी नसतेच!

आजमितीपासून मोजून साठ वर्षांपूर्वी इथे एक वस्तू वास्तू उभी झाली. पूर्वी इथे झोपडीच होती. गायी-गुरांचा चारा साठविण्याची जागा म्हणजे घास बंगला. इथे कोणीतरी ' सिव्हिल '

माणूस राहायचा म्हणे ! त्याने या बंगलीच्या भिंतींना पिवळा रंग दिला होता म्हणे ! म्हणून त्याला पिली बंगली म्हणत म्हणे ! खरे खोटे देव जाणे !

अशा या पिवळ्या खास बंगल्यात एका अगदीच अन्सिब्हिल व्यक्तीचे पाय लागले. १९२१ मध्ये म. गांधींच्या आदेशाने पू. विनोबा वर्ध्याला आले. त्यांचा पहिला मुक्काम याच बंगलीत! म. गांधींची काहीतरी योजना होती. कदाचित आपणाला अनुकूल असे वर्ध्याचे वातावरण त्यांना तयार करायचे असेल. त्यासाठी पावन, पवित्र आत्मा त्यांना हवा होता. म्हणून तर त्यांनी विनोबांना अगोदर पाठविले नसेल ? पूर्वीचे ऋषीमुनी आणि राजकारणी लोक असेच अग्रदूत पाठवायचे आणि परिस्थितीची अचूक जाणीव करून घ्यायचे. अगस्ती ऋषीचे आगमन असेच विदर्भात झाले !

जमनालालजींना गृहस्थानी असलेले पू. विनोबाजी आल्याबरोबर त्यांना कुठे ठेवू, कसे ठेवू असे जमनालालजींना वाटले असेल. पू. विनोबांना बंगले, माडया, गाद्यागिर्द्या, पंचपक्कान्न अशा थाटात ठेवणे शक्यच नव्हते. संन्यस्त धर्माचे अनुसरण विनोबांनी बालपणीच सुरू केले होते. त्यांचा प्रवासच ब्रह्मविद्येच्या प्राप्तीसाठी होता.

आद्य शंकराचार्यांनी 'करतल भिक्षा तरुतल वासः' हा संन्यासाचा धर्म नेमून दिला. समर्थ रामदासांनी 'ॐ भवती या पक्षा राखिले पाहिजे' हा आदेश दिला. म्हणजे संन्यासाश्रम हा गृहस्थाश्रमाच्याच आश्रय आधारावर अवलंबून आहे. जमनालालजी वृत्तीने विरक्त. पण काही विशिष्ट उद्देशानेच गृहस्थाश्रम त्यांनी स्वीकारला. त्यांची गृहसंस्था या ठिकाणी जरा विशद करायला हवी.

श्री. जमनालालजी (सन १८८९), श्रीमती जानकीदेवी (पत्नी : पाच वर्षांनी लहान). जमनालालजींचा विवाह त्यावेळच्या प्रथेप्रमाणे व ऐपतीप्रमाणे १९०२ मध्ये संपन्न झाला. त्यावेळी जमनालालजींचे वय १३ वर्षांचे व जानकीबाई ८ वर्षांच्या. ह्या दांपत्याची औरस संतती—

(१) **कमलाबाई** (२७–८–१९१२) : कमलाबाईंचा विवाह १९२६ मध्ये बापूंच्या उपस्थितीत साबरमती येथेच झाला; अगदी साध्या पद्धतीने. वाजवाजंत्री काही नाही. मान-पान काहीही नाही. स्थळ अनुरूप मिळाले. श्री. नेवटिया. जातीप्रथेप्रमाणे या समंत्रक विवाहाचे साधेपण त्या काळाच्या मानाने लक्षणीयच होते.

(२) **कमलनयन** (२३-१-१९१५) : कमलनयनला बालपणापासूनच बापू-विनोबांच्या सुपूर्द केले गेले. शिक्षणाच्या पदव्या तर मिळाल्या नाहीत पण धी-बुद्धी विलक्षण तीव्रतेने विकसित झाली. बरेच शिक्षण पू. विनोबांकडे! या शिक्षणात सेवायोगाचे शिक्षण अधिक. कमलनयनजींनी 'आचार्याय प्रियं धनं आहृत्य' या अनुशासनाला अनुसरून प्रिय धन दिले की नाही, कोण जाणे. पण दिले ते असे दिले की त्याला तोड नाही. वडिलांच्या निधनाचे दुःख मनात ठेवून गुरुऋणाची फेड त्यांनी अशी केली की, पित्याने जिथे देह ठेवला त्याच भूमीला वंदनीय समजून या परिसरात अनोखे, अभिनव असे **गीताई मंदिर** बांधले. या मंदिराचे वैशिष्टय, महिमा वर्णनातीत आहे. शब्दाने समजावून देणे अशक्य. ज्या कुणाला डोळे आणि दृष्टी दोन्ही असेल त्याने जावे — बघावे आणि झालेच तर आकलन करून घ्यावे.

(३) **मदालसा** (२७–८–१९१७) : जमनालालजींच्या ह्या तिसऱ्या अपत्यालाही त्यांनी विनोबांच्या स्वाधीन केले. पू. विनोबांनी तिची जाणजाणीव विकसित तर केलीच पण दीक्षा विरक्ती, त्यागाची दिली. मदालसेच्या सुदैवाने ११–७–१९३६ रोजी तिचे लग्न झाले तेव्हा तिला असा वर मिळाला की, ज्याने सर्वार्थाने जमनालालजींच्या कुटुंबातच आपला समावेश करून सोन्याला सुगंध, असे काहीतरी केले! श्रीमन्नारायण (अग्रवाल) यांचेशी मदालसा विवाहबद्ध झाली आणि श्रीमन्जींनी मधमाशीसारखे जिथून घेता येतात तिथून मधुबिंदू घेऊन जीवनाचे पोळे मधुमय करून टाकले. "जिस जगह जाना सबेरे उस जगह से बढके सो" हा त्यांचा क्रम. पू. विनोबा, पू. बापू यांची रहस्यनामावली तर त्यांनी आत्मसात केलीच पण पुढे शिक्षण, राजकारण, राजदौत्य, राज्यपालपद हे सगळे विवेक सांभाळून स्वीकारले. जमनालालजी गेल्यानंतर वर्ध्याचे पोरकेपण अंशत: दूर करण्यात श्रीमन्जींचा मोठा वाटा! कमलनयनजींनी गीताईला रूप-लावण्य दिले; श्रीमन्जींनी **गांधी ज्ञानमंदिराची** कल्पना प्रत्यक्षात आणली. शिलान्यास १९५० मध्ये, डॉ. राजेंद्रबाबूंच्या हस्ते. गांधी ज्ञानमंदिराचा निर्माण खर्च श्री. जानकीदासजी पोद्दार यांनी आपले वडील राधाकृष्णजी पोद्दार यांच्या स्मृती-प्रीत्यर्थ केला. ५ जानेवारी १९५४ रोजी पं. जवाहरलालजी नेहरू यांनी गांधी ज्ञान-मंदिराचे उद्घाटन केले. नेहरूजींना अर्थातच जमनालालजींची आठवण आली. 'हे मंदिर म्हणजे जमनालालजींचे स्वप्न' असे संबोधून ते म्हणाले—

"गांधी ज्ञानमंदिर यों तो एक छोटी सी इमारत है। मगर इसके पीछे जो तत्त्वज्ञान है, वह बहुत बडा है और उसे हमें समझना चाहिए। विनोबाजी ने ठीक ही कहा है कि, आत्मज्ञान और विज्ञान का मेल है गांधी-ज्ञान।"

(४) **उमा उर्फ ओम** (१३–८–१९१९) : कमलाबाई, मदालसा आणि ओम् या तिन्ही मुलींचे जन्म ऑगस्ट महिन्यात. एक शुभयोगच! चि. उमा अर्थातच गांधी-विनोबांच्या सान्निध्यातच वाढली. या दोघी मुलींना जमनालालजींच्या मनात ब्रह्म-चर्याचीच दीक्षा देण्याचे होते. दोघींनीही सत्याग्रह आंदोलनात भाग घेऊन तुरुंगवास पत्करला. शुभसंस्कार होते. जमनालालजींनी सर्व कौटुंबिक जबाबदारी व्यतिरिक्त इतर संगोपन आपले गुरु आणि पिता यांच्यावर सोपविले होते. चि. उमाचे लग्न श्री. अग्रवाल यांचेशी होऊन इथे शिकलेल्या सर्व चांगल्या गोष्टी चि. उमाच्या गृहस्थाश्रमात चालू आहेत.

(५) **चि. रामकृष्ण** (२२–९–१९२३) : जमनालालजींच्या औरस गृहस्थाश्रमीचे हे शेंडेफळ. कमलनयनजींच्या निधनानंतर सर्व जबाबदारी चि. रामकृष्णवर पडली आणि ती त्याने ऐहिक आणि पारमार्थिक असे दोन्हींचे भान ठेवून अत्यंत विवेकीपणे सांभाळली.

पती-पत्नी आणि पाच अपत्ये, असे हे जमनालालजींचे कुटुंब. एका ठिकाणी राहून वाढलेले. कुटुंब हा शब्द मी 'हितोपदेश' मधून घेतला आहे. आणि 'उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम्' हे वचन मला अभिप्रेत आहे. जमनालालजींच्या उज्ज्वल चारित्र्याची बूज राखण्याचे ब्रीद आता सांभाळायचे आहे ते चि. रामकृष्णला. पत्नी

सौ. विमलादेवी व मुले चि. शेखर, चि. मधुर, चि. नीरज, यांना ! ते सांभाळतील ही आशा आणि ईश्वराजवळ प्रार्थना !

चि. कमलनयनजींच्या मागे पत्नी श्रीमती सावित्रीदेवी, चि. राहुल, चि. शिशिर यांच्याबरही गुरुऋण, पितृऋण फेडण्याची जबाबदारी आली आहे. चि. सावित्रीदेवी सर्व कुटुंबियांप्रमाणे स्वातंत्र्याचे चळवळीत तुरुंगवास पत्करून आणि तेथील संस्कारांनी अंतर्बाह्य बदलून, एका विवेकी भूमिकेत स्थिर झाली आहे. या वसुधैव कुटुंबामध्ये जमनालालजींचे सख्खे पुतणे श्री. राधाकृष्णजी बजाज, सौ. अनसूया बजाज आणि त्यांची अपत्ये यांनाही सामावून घ्यायला हवे. कारण आपल्या सर्व प्रवृत्तींत जमनालालजींनी राधाकृष्णजींना हाक दिली आणि प्रत्येकवेळी राधाकृष्णजींनी तत्परतेने होकार भरला. गांधी–विनोबांचे विचार आणि आचार त्यांच्या रोमरोमात भिनून गेले आहेत. सावध पिता, तल्लीन माता ! त्यांच्या अपत्यांचा योग म्हणा, भाग्य म्हणा––ते असे की, या सर्व अपत्यांना आई-बापांनी प्रत्यक्ष जीवनात झोकून दिले. काठावर सुखेनैव बसून जीवन बघता येते पण ते शब्दोच्चारासारखे. जीवनात उडी घेऊनच त्याची लांबी, रुंदी, खोली कळते, आकळते! शिवाय तनमन न्हाऊन निघते, ते पुण्यच! या सर्वांच्या मेलमिलापाने हे वसुधैव कुटुम्बकम्, यांच्या निमित्ताने व विनोबांच्या आगमनाने बजाजवाडी बसली, नांदली आणि अजूनही तिची मुद्रा 'भद्राय' राजत-विराजत आहे.

### 'मुद्रे'चा राजविराज महिमा

बजाजवाडीचा परिसर खरोखरच अगदी साधा आहे. डामडौल नाही. वैभवाचे नाव नाही. विलासाचे गाव नाही. झाडी-झुडी खूप आहे. वारापाणी मुबलक आहे. निवाऱ्याची सोय आहे आणि आल्या-गेल्याबद्दल मान आहे. फाटकातून आत शिरल्याबरोबर कदंब, चिंच, कडुलिंब, चाफा यांचे दर्शन होते. कारण ती उंच आहेत. आकाश गाठणे हे त्यांचे ध्येय आहे. त्यांच्यासारखेच वर नजर लावून उंच उंच जावे, असा त्यांचा आदेश आहे. किती वर्षांपूर्वी हे अंकुर उगवले, यांना जगवले कुणी, वर्षांवर्षांनी ते वाढले किती, कसे याची मिती नाही आणि बुद्धी चालेल अशी गती नाही. ज्याचा पहिला पदरव या आसमंतात ऐकू आला असेल, त्या मानवाने प्रथम याच निसर्ग-देणगीला नमस्कार केला असेल. आपल्यालाही नमस्कार करणे भागच!

फाटकातून आत शिरल्याबरोबर पहिली नजर जाते, ती एका बंगलीवर. वाडी वेगळी. वाडीला निसर्गाची साथ असते. वाडा वेगळा कारण त्याचा पवाडा फार असतो. बंगलीची वास्तू भव्य नाही की दिव्य नाही. पण इथे जे घडले ते भव्यापेक्षाही भव्य होते, दिव्यापेक्षाही दिव्य होते. उजव्या बाजूला एक झोपडी आहे. तीन खोल्या आहेत. एका खोलीतून जमनालालजींचा कारभार चालायचा. तेथे श्री. दामोदरदास मुंदडा हसतमुख कार्यमग्न असायचे. दुसऱ्या दोन खोल्यांत आचार्य भणसाळी राहायचे. काही दिवस तेथे कस्तुरबा राष्ट्रीय स्मारक निधीचे कार्यालय होते.

ही बंगली १९२५ साली जमनालालजींनी उभी केली. कारण गुरूंचे सान्निध्य त्यांना हवे होते. विनोबांची झोपडी शेजारीच. आता मोडकळीस आलेली आहे. ही झोपडी

सोडताना विनोबांना काय वाटले असेल? काही काही वाटले नसेल! 'यदा ते मोह कलिलम्' हे त्यांनी तर आत्मसातच केले होते आणि दुसऱ्यांनाही करायला लावले होते. 'मोह गेलाचि तो देवा' ही त्यांची स्थिती. या झोपडीचे काहीतरी स्मारक असावे, असे विनोबा सोडून सर्वांनाच वाटले असावे. आणि विनोबांकडे पाहून त्यांनी आपले वाटणे मनातच ठेवले असावे.

या बंगलीच्या मागे डाव्या बाजूला गेस्ट हाऊस म्हणजे अतिथीगृह आहे. त्या शेजारी राधाकृष्ण बजाजचे घर. दोन्ही घरे एकाच आकार प्रकाराची. हे आपले घर आहे, याची जाणीव राधाकृष्णजींना बरेच दिवस झालीच नसेल. कारण ते तिथे राहिले नाहीत. घर असून कार्यव्यग्रतेने घराबाहेर राहणारे, असे हे दांपत्य!

आणखी थोडे पुढे गेले की, जाजूवाडी सुरू होते. इथे पूर्वी तीन घरे होती. आता चार-दोन घरांची आणखी भर पडली आहे. पहिल्या सीमेला बंगली आणि शेवटच्या सीमेला आमच्या किसन दादाची झोपडी. राखणदारी कशाची करायची हे कुणाला कळतही नव्हते आणि कळण्याची गरजही नव्हती.

जमनालालजींचा पसारा मोठा. आवाक्यात मावणार नाही इतक्या संस्था उभारल्या गेल्या. शिवाय माणसे हुडकण्याची, शोधायची, त्यांना आपलेसे करून वर्ध्याला आणण्याची आणि आणल्यावर त्यांना जोडून ठेवण्याची कला जमनालालजींना जन्मापासूनच साधली असावी. माणसाची ओळख त्यांना तात्काळ जमायची. या परिसरात ज्यांची सोय लागली, त्यांची नावेच देणे बरे. म्हणजे नामस्मरण घडेल आणि पदरवाचे वर्णन होऊन जाईल. पू. विनोबाजी, सर्वश्री श्रीकृष्णदास जाजू, काका कालेलकर, किशोरीलाल मश्रूवाला, आर्यनायकम् पती-पत्नी, दादा धर्माधिकारी, जे. सी. कुमारप्पा, भारतन् कुमारप्पा, रघुनाथ श्रीधर धोत्रे, बाळकोबा भावे, श्रीमन्नारायण, द्वारकानाथ लेले, बाबाजी मोघे, गोपाळराव काळे, वल्लभस्वामी, गोपाळराव वाळुंजकर, मनोहर दिवाण, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, कृष्णदास गांधी, आचार्य भणसाळी, परचुरे शास्त्री, धर्मानंद कोसंबी, वैजनाथ महोदय, डॉ. जगन्नाथ महोदय, डॉ. मनुभाई त्रिवेदी, महादेवभाई देसाई, प्यारेलालजी, डॉ. सुशीला नायर, मीराबेन, छोटेलाल जैन, वृषभदास रांका.

ही नामावली संक्षिप्तच म्हणावी लागेल. यापैकी काही दिवस पू. विनोबाजी यांचा मुक्काम बजाजवाडीत होता. जाजूवाडीत स्वतः श्रीकृष्णदासजी जाजू आणि त्यांचे कुटुंब राहात होते. तिथेच वेगळ्या घरात धोत्रे कुटुंब आणि दत्तोबा दास्ताने. राधाकृष्णजींच्या घरात दादा धर्माधिकारी कुटुंब, वृषभदास रांका कुटुंब, अतिथी निवासात किशोरीलाल मश्रूवाला, महादेवभाई देसाई ही कुटुंबे तिथेच राहिली, नांदली.

राज-काजाचा सर्व आटोप बंगलीत सांभाळला जायचा.

या प्रकरणाला सुरुवात चिमण्या-साळुंक्यांच्या पावलांनी केलेली आहे. म्हणून मोठ्यांच्या अगोदर छोट्यांच्याच लीला बघणे बरे. बजाजवाडीतील कुटुंबे व्रती होती. सुशील होती. पण सोवळी कर्मठ नव्हती. त्यांची लेकरे दुडदुडीपासून धावण्यापर्यंत आली आणि एक नवल वर्तले! मुलांचे पाय पाळण्यात दिसतात याचा नक्की अर्थ अति

वापरामुळे लुप्त झाला आहे. बजाजवाडीतील या मुलांनी एक नियम केला. तो त्यांच्या स्वभावाला धरूनच होता. तो नियम म्हणजे खूप काम करायचे, खूप खायचे, खूप खेळायचे. संध्याकाळचे त्यांचे खेळण्याचे आवाज, आरडाओरडा — तो ऐकूनच तर सरकार जागे झाले आणि बजाजबाडीकडे वाकड्या नजरेने बघू लागले. या पोरट्यांनी आपली जशी काही असेल तशा खोपडीतून नावही मोठे अजब शोधून काढले — घनचक्कर समाज!' थोरामोठ्यांनीही सतत याद ठेवावी, असे हे नाव. घन — सॉलीड, चक्कर — संघ, समूह! घनचक्कर समाजाचे सदस्य (१) रामकृष्ण बजाज, (२) नारायण जाजू, (३) प्रद्युम्न धर्माधिकारी, (४) यशवंत धर्माधिकारी, (५) चंद्रशेखर धर्माधिकारी, (६) मोहन धोत्रे, (७) ईश्वर रांका, (८) दामू जोशी, (९) गुणवंत साळवे, (१०) वीरभद्र गुळवे, (११) मदन बजाज आणि (१२) लाली (खान अब्दुल गफ्फार खानचा धाकटा मुलगा). या घनचक्कर समाजाने देहाचे भान विसरून खेळ मांडला. खेळातही एक वळण येत असते. इंग्रजीत एक म्हण आहे की, वॉटर्लूची लढाई हॅरो—इटन आणि रग्बीच्या मैदानावर लढली गेली. कारण खेळाडू मुलांना जिवाच्या खेळासाठी मैदानच हवे असते.

म. गांधींचे क्षणाक्षणाचे वागणे मोजून मापून, विचार करून असायचे. त्यांचे मत असे होते की, माणूस झोपतो तो मरतो आणि सकाळी उठला की त्याला ताजेतवाने वाटते. याचे कारण त्याला सूर्यकिरणांपासून ऊर्जा मिळते. ही प्राप्त ऊर्जा-उत्साह-सूर्य मावळायच्या आत संपवून ज्याची त्याला देणे हे माणसाचे खरे कर्तव्य. ही ऊर्जा तशीच ठेवली, तर तिची परिणती वासनेत, विकारात होते आणि मनाची अस्वस्थता वाढत जाते. या अस्वस्थतेवर सहा चोर झडप घालतात.

ही ऊर्जा कुणीही देवो पण अमेरिकेने काही आकडेवारी दिली आहे. लहान मूल तासतास हातपाय हलविते. त्या हालचालींनी त्याचा चार किलोमीटर चालण्याचा व्यायाम होऊन जातो. घरकाम करणारी गृहिणी कामानिमित्त आतबाहेर करते, ती जवळजवळ सहा किलोमीटर चालते.

घनचक्कर समाजाचे हे टोळके असेच आपल्यातली साचलेली ऊर्जा या छोट्या मैदानाला घामाने भिजवीत जिरवून टाकत असे. वासना-विकाराचा लेशही शिल्लक राहात नसे. सकाळी ऊर्जा द्यायला 'धाता यथा पूर्वमकल्पयत्' असा सूर्यदेव आहेच की! म्हणूनच या चमूमधला, या टीममधला प्रत्येक पोर पुरुष झाला आणि त्यांनी आपले जीवन पुरुषार्थ-मार्गाला लावले.

नकळत्या वयातही देवाचे भान असतेच. ही घनचक्कर मंडळी गणेश स्थापना करीत असत. अन् जी मंडळी इतर कोणाला सहसा बधत नसे, ती मंडळी निमूट व्याख्यानाला येत. करता काय? 'अस्वलाने गुरू केला नखे ओरबाडी अंगाला' अशी गत व्हायची! पण एक मात्र जरा जादाच! स्वतः ही मुले खेळत फुटबॉल, हॉकी, व्हॉलीबॉल. खेळू द्या, काही बांधो नाही! पण आपल्या खेळात पं. नेहरू सारख्या जगन्मान्य पुढाऱ्यालाही खेळायला लावीत आणि ते बिचारे शंकरराव देव! जन्मभर एक वस्त्र. जपी, तपी, व्रती. पण त्यांनाही या पोरट्यांनी त्यांची लुंगी सावरीत

खेळायला की हो लावले! बरे झाले. कुणी चिल काढले नाही. थोरांनाही उत्साहाचे उधाण आणते; हेच जीवनाच्या खेळाचे सामर्थ्य!

ह्या झाल्या छोट्यांच्या गोष्टी; आता मोठ्यांच्या. मोठीच माणसे! मोठी किती? बघताना आपल्या टोप्या पडतील, इतकी मोठी! कोणी मंदिराचे कळस, कोणी स्तंभ, कोणी मनोरे, कोणी मिनार! देशोदेशींचा, प्रांतोप्रांतांचा, शहरा-गावांचा, खेड्या-पाड्यांचा माणूस इथे जमायचा. या सर्वांना जमनालालजींचे जाहीर आमंत्रण — या या, बसा बसा. राजहंसाचा कळप जसा! एकेका नावावर अनेकानेक पुटे किती द्यावी, किती सोडावी – या सगळ्यांच्या पाऊलखुणा लेवून बसलेली ही बजाजवाडी! हे सगळे पाहुणे कामाला यायचे आणि काम झाले की तृप्त होऊन जायचे. त्यांच्या कामाचा आवाका कसा? —

> ‘ आकाश—अंत न कळोनिही अंतरिक्षी
> आकाश आक्रमिती शक्त्यनुसार पक्षी !

या चारित्र्यवंतांची नामावलीही पुरे आहे, कारण तेवढेच शक्य आहे—

सर्वश्री म. गांधी, पू. विनोबा भावे, डॉ. राजेंद्र प्रसाद, श्री. राजगोपालाचारी, डॉ. राधाकृष्णन, व्ही. व्ही. गिरी, डॉ. झाकिर हुसेन, पं. मोतीलाल नेहरू, पं. जवाहरलाल नेहरू, सरदार वल्लभभाई पटेल, जयप्रकाश नारायण, प्रभावती जयप्रकाश, विजयालक्ष्मी पंडित, मोरारजी देसाई, इंदिरा गांधी, खान अब्दुल गफारखान व कुटुंब, डॉ. खान साहेब, सरोजिनी नायडू, मौ. अबुल कलम आझाद, नेपाळ नरेश व राणीसाहेब, सुभाषचंद्र बोस, गोविंद वल्लभ पंत, पट्टाभिसीतारामय्या, रफी अहमद किडवाई, डॉ. बिधनचंद्र रॉय, डॉ. प्रफुलचंद्र रे, डॉ. प्रफुल्लचंद्र घोष, रवीन्द्रनाथ टागोर, बॅरिस्टर असफअल्ली, अरुणा असफअल्ली, अबिद अली, डॉ. सय्यद महमद, डॉ. सय्यदीन, जे. बी. कृपलानी, के. एम. मुन्शी, डॉ. राम मनोहर लोहिया, गोपीनाथ बारडोलाय, रावसाहेब पटवर्धन, अच्युत पटवर्धन, गुलजारीलाल नंदा, पुरुषोत्तमदास टंडन, भुलाभाई देसाई, घनश्यामदास बिडला, शान्तीप्रसाद जैन, रमा जैन, जे. सी. कुमारप्पा, भारतन् कुमारप्पा, डॉ. हरेकृष्ण मेहताब, विश्वनाथ दास, शंकरराव देव, डॉ. चोईतराम गिडवानी, महादेवभाई देसाई, प्यारेलालजी, डॉ. सुशीला नायर, शंकरलाल बँकर, हरिभाऊ उपाध्याय, डॉ. जॉन माट्ट, ही-ताई--ची-ताओ आणि प्रतिनिधी, सी. एफ अँड्र्यूज, डॉ. व्हेरिअ एल्विन, लॉर्ड लेथिअन, सर एडवर्ड थॉम्सन, सर स्ट्रॅफोर्ड क्रिप्स आणि प्रतिनिधी, बाळासाहेब खेर, बॅरिस्टर मोरुभाऊ अभ्यंकर, मणिबेन कारा, मणिबेन पटेल, डॉ. ना. भा. खरे आणि मंत्रिमंडळ (मध्य प्रदेश), रविशंकर शुक्ल आणि मंत्रिमंडळ (म.प्र.), किशोरीलाल, मश्रूवाला, श्रीकृष्णदास जाजू, प्रा. भणसाळी, जनरल मंचरशा आवारी, पं. द्वारकाप्रसाद मिश्र, रा. कृ. पाटील, पूनमचंद रांका, शरच्चंद्र बोस, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, साने गुरुजी, त्र्यं. र. देवगिरीकर, ठक्कर बाप्पा, जयरामदास दौलतराम.

ही जवळजवळ शतनामावली! भारताच्या राजकारणातील, समाजकारणातील सर्वच थोर थोर मंडळी! आपल्या देशाचे, आपल्या प्रांताचे, गावाचे, शहराचे भले करण्यासाठी सर्वच वर्ध्याला येत. या सगळ्यांचे ‘ पाहुणेर ’ जमनालालजींकडे असायचे. हजार आले, हजार गेले पण त्याची जमनालालजींना क्षिती नाही—उलट आनंदच! वागणूक अशी की ‘ घर तुमचेच

आहे. तुम्ही येथे परम कार्यासाठी आला आहात. माझे घर तुमचेच आहे!' आणि जमनालालजींचे घर म्हणजे मोठी मजेदारच संस्था ! जास्ती पाहुणे आले की हे सगळे घरचे घरच एका जागेवरून दुसऱ्या जागेवर जायचे आणि हे कोणाला कळायचेही नाही. या मायलेकरांना जणू हे रोजचेच होते.

ही मंडळी काम संपले की, मिळेल त्या साधनांनी परतत. राष्ट्रा-परराष्ट्राची माणसे येत ती राष्ट्रीय कामासाठी. गांधीजी वर्ध्याला १९३३ मध्ये आले आणि त्यानंतर काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सर्व बैठकी बजाज वाडीत झाल्या. गांधीजी बैठकीनिमित्त बजाजवाडीला येत आणि वर्किंग कमिटीचे सदस्य काही विचारविमर्श करावयाचा झाल्यास गांधीजींना भेटायला सेवाग्रामला जात. १९३४ ते ४२ चे दरम्यान राष्ट्रीय कार्य कोणत्या पायरीपासून कोणत्या पायरीपर्यंत गेले याचा अंदाज बजाजवाडीतील वर्किंग कमिटीच्या बैठकीवरून घेता येईल.

(१) १२ जून १९३४
(२) २५ सप्टेंबर १९३४
(३) २९ जुलै १९३५
(४) जुलै १९३७
(५) जानेवारी १९३८
(६) ऑगस्ट १९३९
(७) १० सप्टेंबर १९३९
(८) ९ ऑक्टोबर १९३९
(९) १८ डिसेंबर १९३९
(१०) १८ ऑगस्ट १९४०
(११) २० ऑक्टोबर १९४१
(१२) नोव्हेंबर १९४१
(१३) १३ जानेवारी १९४२
(१४) १४ जुलै १९४२

रचनात्मक कार्य, ग्रामोद्योग, समाज सुधारणा, अस्पृश्योद्धार पासून एक एक पाऊल पुढे टाकीत टाकीत शेवटच्या चौदाव्या बैठकीत गांधीजींनी असा काही उपाय सुचविला की, जो उपाय आजवर सुचविला गेला नव्हता, आणि जो पुढे कधी सुचविला जाईल की नाही, कोण जाणे ! जगन्मित्र गांधीजींना अत्यंत अनिच्छेने इंग्रजांना सांगावे लागले की बाबानो, आमचे काय होईल ते होऊ द्या. पण तुम्ही मात्र आता आमचा हिंदुस्थान सोडून चालते व्हा ! भारत छोडो–क्विट इंडिया !

आणि ब्रिटिशांनी खरोखरच दोनशे वर्षांनंतर इंडियातून 'क्विट' केले !

प्रत्येक कार्यकारिणीच्या बैठकीत काय झाले याचा इतिवृत्तांत लिहिण्याची आवश्यकता नाही. तो सहज उपलब्ध होऊन जाईल. बजाजवाडी ही भारताची केंद्रबिंदू कशी झाली, ती कोणामुळे झाली, हीच भावना येथे प्रस्तुत आहे. बजाजवाडीत दीर्घकाळपर्यंत वास्तव्य करणारी

मंडळी दोनच. पहिले सरहद्द गांधी (बादशाहखान) आणि त्यांचे कुटुंब. दुसरे भारतरत्न डॉ. राजेंद्र प्रसाद. वर्ध्याची हवा कोरडी, त्यांना दम्याची व्याधी. वर्ध्याला त्यांना बरे वाटत असे आणि शक्यतो वेळ काढून ते वर्ध्याला येऊन राहात. सरहद्द गांधींची ती गोरी धिप्पाड मूर्ती आणि ' अज खुदी खता अज बुजुर्गी अता ' हे वाक्य अजून बजाजवाडीत ऐकू येते. राजेंद्रबाबूंचे सौम्य प्रसन्न स्मित अजून बजाजवाडीत दृष्टी असणाऱ्यांना दिसते. बंगलीच्या व्हरांड्यात एक मोठी आरामखुर्ची, तिच्यात बसलेले जमनालालजी! बाबूजी आले की ती खुर्ची बाबूजींची व्हायची. फाटकात शिरता शिरता त्यावेळी ह्या दोनच मुद्रा दिसायच्या.

या सगळ्यांचे आतिथ्य, खाणे पिणे, राहणे, लेणे बजाजवाडीने भूषविले. एक ठराविक पद्धत——तीही धर्मशास्त्रीय ! जो जसा असेल तसे त्याला राहायला, खायला मिळायचे. याचा आगाजा भारतभर पोहोचला होता हे खरे. पण त्यातही एक मर्यादा होती. गांधी-विनोबां-मुळे सामिष भोजन शक्यच नव्हते. कडकडून भूक लागली की जे खाऊन तृप्ती होईल, तेच भोजन बजाजवाडीत मिळायचे.

" सत्त्व प्रीति सुख स्वास्थ्य आयुष्य बळ वाढवी ।
रसाळ मधुर स्निग्ध स्थिर आहार सात्विक ।। "

हे त्या आहाराचे स्वरूप ! या मर्यादेत जे बसेल ते सगळे मिळत असे. बाहेरच्यांना चहाची मुभा होती. सरोजिनी नायडूंना हिरवी मिरची आवडायची——मिळत असे ! नेहरूंना खमंग टोस्ट आवडायचा——मिळत असे ! हसत-खेळत, मौज-मजेत पंगत चालायची, टेबल-खुर्ची नाही, साधे पाट-ताट. वर्किंग कमिटीचे काम संपवून वल्लभभाई, नेहरू, सरोजिनीबाई अशी जवळजवळ मंडळी बसत. गप्पागोष्टींना ऊत येई. जेवणाच्या वेळी ऋतुकालोद्भव फळे असतच आणि ऋतुकालाचे धान्यही असायचे. त्यात हुरड्याचा, मक्याच्या कणसांचा मान आणि रुबाब विशेषच. जेवतेवेळचे हास्यविनोद नुसते सूचित केले तरी पसारा वाढेल. खरी गोष्ट अशी की, बजाजवाडीत आलेल्या प्रत्येक पाहुण्याचे एक तर चरित्र लिहिले गेले आहे किंवा आत्मचरित्र प्रसिद्ध झाले आहे. बजाजवाडीच्या चरित्रात हा विस्तार नसणे बरे ! खेळ खेळ तरी इतका चालायचा की पानात जो अन्न टाकील त्याला एक रुपया दंड व्हायचा आणि पानात टाकलेले दिसू नये म्हणून जो पाहुणा वाटीखाली झाकायचा त्याला दोन रुपये दंड व्हायचा. अर्थात दंड वसूल करणारी यंत्रणा बजाजवाडीत नव्हती, हे खरेच ! पण दंड भरूनही पाहुणा जेवण संपल्यावर ' अन्नदाता सुखी भव ' असे म्हणायचा आणि असे म्हणत म्हणतच बजाजवाडी सोडायचा.

जमनालालजींची आतिथ्यशीलता एका बाबतीत उल्लेखनीय ठरली आहे. एकदा जनरल मंचरशा आवारी दुपारी अचानक बजाजवाडीत आले. बजाजवाडीतला चौका उठला होता. काकाजींनी पुन्हा स्वयंपाक करायला सांगितले. आवारीजींना ताजे अन्न खाऊ घालण्याचा आदेश दिला. स्नानादि आटपून तासा दीड तासाने आवारी जेवायला बसले. काकाजी समाचाराला गेले, बघतात तो वाढप सगळे गार झालेले. आवारीजींना याची क्षिती नव्हतीच. वाढलेले सगळे अन्न एकत्र करून चवीढवीची पर्वा न करीत रोज जेवणारा हा सैनिक जेवत होता. प्रायश्चित्त मात्र काकाजींनी घेतले. अतिथी धर्माचे उल्लंघन झाल्याबद्दल स्वत: एक दिवस उपवास केला. स्वयंपाक्याला व व्यवस्थापकाला एक शब्दही न बोलता जो धडा मिळाला तो कायमचाच. ' सावधपण सर्व विषयी ' हेच तर काकाजींचे जीवन रहस्य !

आता काकाजी गेले, गांधीजी गेले, विनोबांनीही इहलोकीचा मुक्काम हलविला. आता बजाजवाडीत उरल्या आहेत फक्त पाऊल खुणा! या खुणा पाहूनच अंतरीची खूण ओळखायची!

बजाजवाडीला पुष्कळांनी सद्‌भावनेने, कृतज्ञतेने राष्ट्रीय अतिथीगृह म्हटलेले आहे. पण राष्ट्रीय काय, आंतरराष्ट्रीय काय किंवा वैश्विक काय, कोणतेही विशेषण वापरले तरी अतिथीगृहाची मूळ कल्पना उदात्त होऊ शकत नाही. अतिथीगृह वेगळे आणि 'अतिथी देवो भव' ही कल्पना वेगळी. इथे थोर थोर माणसे आली, तृप्त झाली पण ती आतिथ्यासाठी कधीच आली नाहीत. कामासाठी आली होती–कामापुरतीच राहिली होती. अतिथी-गृहात मनुष्य खानपानाची कल्पना मुख्यतः घेऊन जातो. या कल्पनेने कुणीच आला नाही म्हणून बजाजवाडीला अतिथीगृह म्हणू नये! ते कर्मक्षेत्र असू शकेल. कर्म प्राधान्याने कुरु-क्षेत्रही होईल आणि अध्यात्म साधनेने जरा पुढचे पाऊल टाकून धर्मक्षेत्र होऊन जाईल. धर्मक्षेत्राला भौगोलिक मर्यादा नसते. बजाजवाडी हे धर्मक्षेत्रच! जे घडले–जे घडत होते ते सगळे धर्म्यच होते. देवाच्या-धर्माच्या साक्षीने घडले होते.'

झाले! संपली कहाणी आमची. आता हात जोडून विनंती!

रोमच्या इतिहासात एका अद्‌भूत स्मारकाची हकीगत आहे. स्पार्टाची लढाई संपली. त्या गावाच्या सीमेवर एक दगड आहे. त्यावर एक वाक्य आहे––" हे प्रवासी लोकहो, तुम्ही ह्या दिशेने कधी स्पार्टाकडे गेलात तर स्पार्टन लोकांना आमचा निरोप सांगा की, या ठिकाणी आमच्या देशासाठी आम्ही आमचे देह ठेवले आहेत. . . . "

आपण सर्वच प्रवासी आहोत, घडीचे दो घडीचे असू, कदाचित क्षणा दो क्षणाचेही असू; कधी दिवसा दो दिवसांचे, कधी वर्षा दो वर्षांचे असू! पण प्रवासीच! ह्या जीवनाच्या प्रवासात माझ्या भारतीयांनो, तुम्ही कधी वर्ध्याला गेलात तर जरूर 'उजवी' साधा आणि या पाऊल खुणा, मुद्रा डोळे भरून पाहून घ्या! हीच वेळ आहे. घडीचा भरोसा देता येत नाही–कुणाला आजवर देता आला नाही.

**" नमस्ते सते ते जगत्कारणाय "**

ईश्वरा, देवाधिदेवा! अखेर तुझ्याच चरणी माथा टेकतो! भगवंता, माझ्या हृदयात तुझी षोडशोपचारे पूजा मी बांधली आहे. या पावनक्षणी जगच्चालका, तुझ्या एका वचनाची तुला आठवण देतो! हे वचन तू कुरुक्षेत्रावर दिले आहेस. सगळयांच्या देखत दिले आहेस.

" यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥ "

पाच सहस्र संवत्सरापूर्वी तू हे वचन दिले आहेस. काळ लोटला आहे, पण वेळ आली आहे, देवा!

उगीच नामदेवाचा अभंग आठवतो:

**" पक्षिणी प्रभाती चारियासी जाये।**
**पिलू वाट पाहे उपवासी॥ "**

हे माझ्या पिल्या राजा, तुझी पक्षीण शोधायला मी जातो आहे. तोवर हे दोन खाऱ्या पाण्याचे थेंब पिऊन टाक !

खारीच्या अंगावरील वाळू कणाइतक्याच मोलाचे हे धर्मकीर्तन ! देवा, हे तुझेच आहे म्हणून तुझ्याच चरणी ! !

**" पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।। "**

---



१९४० मधील व्यक्तिगत सत्याग्रह आंदोलनात विनोबाजींची पहिले सत्याग्रही म्हणून निवड झाली त्यावेळी गांधीजींसमवेत